# नवभारत

वर्ष ७ वें ]  जानेवारी १९५४  [ अंक ४ था



आजच्या ध्येयसृष्टींतील एक अंतर्विरोध . . प्रा. गोवर्धन पारीख
गुरु गोविन्दसिंग . . . . . . श्री. म. वि. भिडे
भारतांतील परकीय वसाहतींचा प्रश्न . . श्री. ना. य. डोळे
अमेरिकन समाजाची घटनाप्रियता . . . प्रा. श्री. बा. काळे
मानवी प्रतिमा व शिल्पकलेचीं मूल्यें . . श्री. माधवराव बागल
'वीर बन्दा' : रवीन्द्रनाथ व सावरकर यांचीं काव्यें . प्रा. दे. अ. दाभोलकर
माध्यमिक शिक्षणाची पुनर्घटना . . . श्री. ल. नी. छापेकर
महात्मा गांधी : कांहीं आठवणी . . . श्री. ज्ञा. उ. मांढरे
सल्फा औषधें : शोध व उपयोग . डॉ. चं. रा. तळपदे-श्री. का. शि. पाटील
व्यक्तिस्वातंत्र्याचा विकास . . . . श्री. मा. प. मंगुडकर
नोबेल-पारितोषिक-विजेता श्वाइट्झर यांचें संस्कृतिविषयक तत्त्वज्ञान
श्री. निसिम ईझेकील अनु० त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी
अमेरिकेचा श्रेष्ठ नाटककार यूजीन ओ'नील

किंमत १ रुपया

अनुक्रमणिका















नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष सातवें | नवभारत | जानेवारी
अंक चौथा | | १९५४

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. गोवर्धन पारीख

प्रा. वि. म. बेडेकर का. संपादक


| | | |
|---|---|---|
| आजच्या आपल्या ध्येयसृष्टींतील एक अंतर्विरोध | प्रा. गोवर्धन पारीख | १–६,९ |
| मानवी प्रतिमा आणि शिल्पकलेंतील मूल्यें | श्री. माधवराव बागल | ७–९ |
| गुरु गोविन्दसिंग | श्री. म. वि. भिडे | १०–१६ |
| रवीन्द्रनाथ व सावरकर यांचा 'वीर बन्दा' | प्रा. देवदत्त अ. दाभोलकर | १७–२० |
| अमेरिकन समाजाची घटनाप्रियता | प्रा. श्री. वा. काळे | २१–२५ |
| कायद्याची मदत व सल्लागारमंडळें | राजरत्न वा. वि. जोशी | २६–२८ |
| भारतांतील परकीय वसाहतींचा प्रश्न | श्री. ना. य. डोळे | २९–३३ |
| महात्मा गांधी : कांहीं आठवणी | श्री. ज्ञा. उ. मांढरे | ३४–३६ |
| माध्यमिक शिक्षणाची पुनर्घटना | श्री. ल. नी. छापेकर | ३७–४१ |
| सल्फा औषधें : शोध, निर्मिति व उपयोग | डॉ. चं. रा. तळपदे व श्री. का. शि. पाटील | ४२–४५ |
| साम्राज्यवादी राष्ट्रें आणि उपासमार (पत्रव्यवहार) | डॉ. रा. अ. करंदीकर | ४५ |
| भाषावार प्रांतरचना : एक महत्त्वाचें संस्मरणीय विवेचन | | ४६–४८ |
| अवचित ये जाग मला —! | श्री. सूर्यकान्त खाण्डेकर | ४८ |
| व्यक्तिस्वातंत्र्याच्या कल्पनेचा विकास | श्री. मा. प. मंगुडकर | ४९–५७ |
| संध्याकाळचें —! | श्री. शंकर रामाणी | ५७ |
| 'वृक्षाचेंहि पान हाले त्याची सत्ता!' | श्री. घनश्यामदास बिर्ला | ५८ |
| श्वाइट्झरचें संस्कृतिविषयक तत्त्वज्ञान श्री. निसिम ईझेकील | अनु. त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी | ५९–६४ |
| चपला | श्री. बी. ज. बोरकर | ६४ |
| अमेरिकेचा श्रेष्ठ नाटककार यूजीन ओनील | | ६५–६६ |
| रहस्य | श्री. जनार्दन देशपांडे | ६६ |


वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत मासिक', ९०६ शिवाजीनगर, पुणें ४

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक, C/o प्राज्ञ प्रेस वाई (जि. सातारा)






# ‘नवभारत’ मासिक, जानेवारी १९५४

## —लेखक-परिचय—

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय, या अंकांतील इतर लेखकांचा परिचय या वर्षी पूर्वी त्यांचे लेख आले त्या त्या वेळीं दिला आहे. — का. सं. ].

**श्री. माधवराव बागल**— कोल्हापूर येथील सुप्रसिद्ध कार्यकर्ते, चित्रकला आणि साहित्य यांचे व्यासंगी.

**प्रा. गोवर्धन पारीख**— मुंबई येथील ‘रामनारायण रुईया कॉलेज’ मध्यें अर्थशास्त्राचे प्राध्यापक. ‘नवभारत’ मासिकाचे एक संपादक. ‘महात्मा गांधी’ या पुस्तकाचे लेखक.

**प्रा. श्री. वा. काळे एम्. ए. पीएच्. डी.**— ( कोलंबिआ )- पुणें येथील स. प. कॉलेजमध्यें तत्त्वज्ञान आणि मानसशास्त्र या विषयांचे प्राध्यापक. भारतीय मानसशास्त्रसंस्था तसेंच अनेक अमेरिकन मानसशास्त्रसंस्था यांचे सदस्य.

**दिवाणबहादुर राजरत्न वा. वि. जोशी बी. ए. एलूएल्. बी.**— ( पुणें ) ‘कठिण कसोटी’, ‘ओघळलेले मोती’ ( कादंबऱ्या ), ‘रेशमी चिमटे’, ‘स्त्रियांचे हक्क व सुधारणा’, ‘जगण्याची कला व मजा’ इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**श्री. ना. य. डोळे एम्. ए.**— पुणें विद्यापीठाच्या ‘राज्यशास्त्रा’च्या विभागांत ‘रिसर्च फेलो.’

**श्री. ज्ञानेश्वर उद्धव मांढरे**— ( पुणें ) श्रीगुलाबराव महाराजांच्या समग्र ग्रंथांचे एक प्रकाशक. कै. न. चिं. केळकर यांच्या ‘ज्ञानेश्वरी-सर्वस्व’ या पुस्तकाला यांनीं ‘ज्ञानेश्वरीसर्वस्व-पुरवणी’ म्हणून लिहिली आहे.

**श्री. ल. नी. छापेकर एम्. ए. बी. टी.**— चाळिसगांव येथील प्राथमिक शिक्षकांच्या विद्यालयाचे माजी प्राचार्य. चाळिसगांवच्या आ. बं. हायस्कूलचे प्रमुख. ‘स्मृति-सुगंध’ ( साने गुरुजींच्या आठवणी ) याचे संपादक. पाठ्य पुस्तकांचे लेखक.

**डॉ. चं. रा. तळपदे एम्. एस्‌सी. पीएच्. डी.**— पुणें येथील फर्ग्युसन कॉलेजमध्यें रसायनशास्त्राचे प्राध्यापक.

**श्री. का. झि. पाटील बी. एस्‌सी.**— पुणें विद्यापीठांत एम्. एस्‌सीचा अभ्यास करीत आहेत.

**श्री. सूर्यकान्त खाण्डेकर एम्. ए.**— कोल्हापूर येथील ‘महाराणी लक्ष्मीबाई गर्ल्स हायस्कूल’-मध्यें शिक्षक. कांहीं चित्रपटांतील गीतें यांनीं लिहिलेलीं असून, त्यांचा ‘सांवली’ हा काव्यसंग्रह प्रकाशनाच्या मार्गावर आहे.

**श्री. शंकर रामाणी**— नवा गोवा येथें पोर्तुगीज नेव्हिगेशन डिपार्टमेंटमध्यें अंडरसेक्रेटरी. यांच्या कविता मराठी नियतकालिकांतून प्रसिद्ध होत असतात.

**श्री. निसिम ईझेकील एम्. ए.**— ‘Illustrated Weekly of India’ चे उपसंपादक. अनेक देशी विदेशी मासिकांतून लेखन. मुंबईंतील Theatre Group या नाट्यसंघटनेचे एक संस्थापक. “A Time to change” या नांवानें यांच्या आंग्ल कवितांचा एक संग्रह नुकताच Fortune Press, लंडन यांनीं प्रकाशित केला आहे.

**श्री. ज. श्री. देशपांडे बी. ए. एलूएल्. बी.**— बुलढाणा येथील प्रमुख वकील. यांनीं ईश्वरभक्तिपर काव्यें लिहिलीं असून तीं प्रकाशनाच्या मार्गावर आहेत.

**श्री. वि. ज. बोरकर**— मुंबई येथील विल्सन कॉलेजमध्यें विद्यार्थी.

अनुक्रमणिका






प्रा. गोवर्धन पारीख

# आजच्या आपल्या ध्येयसृष्टींतील एक अंतर्विरोध

माणसें ज्यामुळें गुण्यागोविंदानें एकत्र राहूं शकतील, प्रत्येकजण आपल्या इच्छेनुसार वागेल आणि तरी देखील सर्व परस्परांशीं सहकार्य करूं शकतील असें राजकीय जीवन निर्माण करण्याचा मूलगामी प्रश्न आधुनिक लोकशाहीचा जनक रूसो यानें निर्माण केला; आणि 'सामान्य इच्छे' (General will) चें आधिपत्य असें त्याचें त्यानें उत्तरहि दिलें. तथापि या सामान्य इच्छेचें स्वरूप प्रत्येकाच्या इच्छेहून भिन्न मानल्यामुळें आधुनिक लोकशाहीचा जनक हा आधुनिक हुकूमशाहीचाहि जनक ठरला. रूसोचें उत्तर हें सामान्यतः धोक्याचें व त्याज्य समजलें जातें; परंतु रूसोचा प्रश्न मात्र अजूनहि कायम आहे. किंबहुना तो राज्यव्यवस्थेइतकाच जुना प्रश्न असून प्रत्येक पिढीनें तो आपापल्या परीनें सोडविण्याचा प्रयत्न करावा असेंच त्याचें स्वरूप आहे, असेंहि म्हणतां येईल. आजचीं राजकीय आंदोलनें एका परीनें हाच प्रश्न सोडविण्याचे प्रयत्न होत.

## लोकशाहीचीं मूल्यें

आजच्या जगापुढील राजकीय प्रश्नाचें स्वरूप अनेक वेळां लोकशाही–विरुद्ध–हुकूमशाही अशा स्वरूपांत व्यक्त केलें जातें. ही मांडणी अगदी साधी, कांहींशी खुळचटपणाची ( naive ) आहे असें म्हणावें लागतें. लोकशाही हवी कीं हुकूमशाही अशा प्रकारचा प्रश्न विचारणें म्हणजेच त्याचें उत्तर देणें होय असें समजलें जातें. हुकूमशाहीपेक्षां लोकशाही चांगली हें सिद्ध करण्याचा खटाटोप बहुंशीं अनावश्यकच म्हटला पाहिजे. आजचे हुकूमशहादेखील आपल्या राज्यव्यवस्थेचें वर्णन 'नवी', 'खरीखुरी', 'जनतेची' इत्यादि विशेषणें लावून कां होईना पण "लोकशाही" याच शब्दानें करतात; यांतील मर्महि हेंच आहे. आजच्या राजकीय संकटाचें आणि तें ज्या संभाव्य अशा भयानक कलहाच्या रूपानें सर्वांनाच भेडसावीत आहे त्या कलहाचें यथार्थ आकलन होण्यासाठीं यापेक्षां अधिक खोलवर विचार होण्याची गरज आहे. सर्वांचें हित प्रत्येकाच्या स्वहितप्रेरित स्वतंत्र प्रयत्नांतून साधावयाचें कीं त्याचें स्वरूप निश्चित करून तें जरूर पडल्यास सर्वांवर लादावयाचें या दोन प्रवृत्तींमधील हा कलह आहे असेंहि म्हटलें जातें. पण हेंहि म्हणणें फारसें समाधानकारक नाहीं. त्यामुळें कदाचित् आजच्या कलहप्रवृत्त राजकीय शक्तींच्या स्वरूपाविषयीं थोडाबहुत बोध होऊं शकेल. तथापि त्यामुळें जें राजकीय अरिष्ट येऊं पहात आहे त्याचें आणि त्यामागील कारणपरंपरेचें यथार्थ आकलन होऊं शकणार नाहीं.

राज्यसंस्था ही मानवानें निर्माण केली असून ती आवश्यक तेव्हां बदलण्याचा त्याला अधिकार आहे ही कल्पना आधुनिक लोकशाहीच्या जन्माला जबाबदार अशी मूलभूत कल्पना आहे. धर्माच्या वर्चस्वापासून, विश्वविषयक दृष्टिकोणापासून मुक्त झालेलें म्हणजेच पर्यायानें स्वायत्त झालेलें ऐहिक राज्य हें आजच्या सगळयाच राज्यव्यवस्थांच्या मुळाशीं आहे. तथापि आधुनिक हुकूमशाहीच्या वैचारिक भूमिकेकडे पाहिल्यास ही मुक्तता केवळ आभासमय ठरते. ती यथार्थ आणि टिकाऊ स्वरूपाची होण्यास लोकशाहींतील दुसरें मूलभूत तत्त्व जबाबदार होय. आणि तें म्हणजे माणूस हें साधन नसून मूल्य आहे हें तत्त्व होय. व्यक्ति हें ज्याप्रमाणें दैवी शक्तीच्या हातांतील खेळणें नाहीं, त्याचप्रमाणें 'इतिहास', 'सामाजिक शक्ती' इत्यादींच्या हातांतील तें बाहुलेंहि नाहीं. तात्पर्य, माणूस हें साधन नसून मूल्य वा साध्य होय या दृष्टिकोणांतून स्वायत्त झालेल्या राज्यसंस्थेची होणारी उभारणी म्हणजे लोकशाही होय. व्यक्तीच्या व्यक्तिमत्त्वाविषयीं आदर, मानवी स्वातंत्र्याचें प्राथमिक मूल्य, शास्ते व शासित यांची एकता इत्यादि मूलभूत कल्पना या दृष्टिकोणांतूनच निघतात. लोकशाहींत अभिप्रेत असलेलें व्यक्तिस्वातंत्र्य हें नैतिक वर्तन आणि सृजनशीलता या दोहोंसहि पोषक ठरतें. लोकशाहीचें इष्टत्व आणि श्रेष्ठत्व हें अशा









अनुक्रमणिका

प्रकारें तिच्या नैतिकतेंत आहे. विवेकशीलता हा तिचा आधार असल्यामुळें मतभेद विरोध वगैरेंची आवश्यकता व महत्त्व आणि हिंसात्मक मार्गाचा त्याग हा लोकशाहींत आपोआपच येतो. व्यक्तिस्वातंत्र्याला प्राथमिक मूल्य म्हणून मान्यता दिल्यामुळें सरंजामशाहींतील सामाजिक स्थानपरत्वें निश्चित होणाऱ्या मानवी संबंधाऐवजीं स्वतंत्र व्यक्तींचे विशिष्ट मर्यादेंतील स्वेच्छाजन्य संबंध हेच लोकशाही मान्य करते. कोणत्याहि बाह्य, असंमत सत्तेपुढें वांकावें लागणें हें व्यक्तिमत्त्वाविषयींच्या आदर्शाशीं विसंगत आहे. उलट, संघटित समाज म्हटला कीं या ना त्या स्वरूपांत सत्ता अपरिहार्य आहे. म्हणून ही सत्ता लोकसत्ताच असली पाहिजे असा लोकशाहीचा आग्रह आहे.

## लोकशाही कीं प्रतिनिधिशाही

तथापि लोकशाहीच्या या तात्त्विक भूमिकेस संस्थात्मक स्वरूप प्राप्त होतांना लोकशाहीचा राजकीय घटक (unit) जो मानवसमाज त्यांतील मोठ्या लोकसंख्येमुळें अडचण निर्माण झाली. प्रचंड लोकसंख्येच्या समाजांत सर्वांनीं एकत्र येऊन सामाजिक प्रश्नावर निर्णय घेणें अशक्यच ! यामुळें प्रतिनिधित्वाची कल्पना निघाली. आणि लोकसत्ता म्हणजे लोकप्रतिनिधिसत्ता, लोकराज्य म्हणजे लोकांना ' जबाबदार ' असलेलें राज्य असें समीकरण बनलें. लोकांनीं आपले प्रतिनिधि निवडून द्यावयाचे, या प्रतिनिधींनीं विशिष्ट कालपर्यंत निर्णय घेण्याचें कार्य करावयाचें, त्यानंतर पुनः निवडणुका व्हावयाच्या—ही पद्धत तात्त्विक दृष्ट्या योग्य व इष्ट नव्हे तर व्यावहारिक दृष्ट्या शक्य व सोयीची म्हणून अस्तित्वांत आली, हें ध्यानांत घेणें जरूर आहे. लोकशाहीचें हें व्यावहारिक स्वरूप इतकें रूढ व मान्य झाल्यासारखें आहे कीं त्यामुळें अनेकांची प्रतिनिधिसत्तेवांचून लोकशाही संभवते यावद्दल विचार करण्याची देखील तयारी असत नाहीं. उलट, ज्या काळांत प्रतिनिधिसत्ता अस्तित्वांत आली, त्या काळांत तिच्या सदोषपणाविषयीं कितीतरी अधिक जाणीव आढळते. तथापि, आजचा खरा प्रश्न प्रतिनिधिसत्तेंतील तांत्रिक अडचणी किंवा दोषाविषयींचा नसून तिच्या स्वरूपांतील धोक्याविषयींचा आहे; आणि हा धोका म्हणजे त्या स्वरूपामुळें निर्माण झालेली सत्तेच्या केंद्रीकरणाची शक्यता हा होय. रूसोनें तर प्रतिनिधिसत्ता म्हणजे गुलामगिरीच होय असें म्हटलें आहे. तथापि त्या टीकेंतील अतिरंजितपणा टाकून दिला तरी त्यामुळें या धोक्याचें अस्तित्व नाकारतां येत नाहीं.

जनतेच्या हातीं असलेली सत्ता अशा प्रकारें मूठभर प्रतिनिधींच्या हवालीं करण्याच्या पद्धतीमुळें निर्माण झालेलें केंद्रीकरण कालांतरानें लोकशाहीच्या ऐतिहासिक विकासक्रमांत वाढतच गेलें. आरंभीं हा धोका तितकासा भासला नाहीं. कारण अनिर्बंध राजसत्ता आणि मूठभर सरंजामदारांचें सामर्थ्य यांच्याविरुद्ध झालेल्या बंडांतून लोकशाहीचा जन्म झाला. त्यामुळें राज्याकरवीं होणाऱ्या हस्तक्षेपाविषयीं संशयाची, किंबहुना विरोधाची दृष्टि तत्कालीन वातावरणांत होती. राज्याच्या हस्तक्षेपामुळें व्यक्तिस्वातंत्र्याला मुरड घातली जाते आणि पर्यायानें सामाजिक हिताला बाध येतो या कल्पनेमुळें राज्याचें कार्यक्षेत्र अगदीं निरुंद आणि घट्ट मर्यादांनीं जखडून मर्यादित करण्याकडेच तत्कालीन कल आढळतो. आणि अशा प्रकारें कार्यक्षेत्र मर्यादित केल्यामुळें राज्यसत्ता मूठभर प्रतिनिधींच्या हातीं असण्यास हरकत नाहीं, अशी दृष्टि त्यावेळीं दिसून आली असल्यास आश्चर्य नाहीं. व्यवहार्य म्हणून मान्य केलेल्या सत्तेच्या केंद्रीकरणाला अशा प्रकारें आळा घातला गेला. आणि त्यांतूनच या नव्या तंत्राविषयीं आशावाद निर्माण झाला. हिंसेची आवश्यकता टाळून, सामाजिक विस्कळितपणा निर्माण न होऊं देतां, समाजिक स्थैर्य कायम राखून आवश्यक तेव्हां इष्ट ते बदल शांततेच्या मार्गानें करतां येतील असें हें तंत्र आहे ही समजूत दृढ झाली; भावी विकासाचा मार्ग त्यायोगानें मोकळा झाला आहे असें वाटूं लागलें.

## स्वार्थ, संचय, स्पर्धा — !

स्वतःच्या हिताहिताचा विचार करण्याचें सामर्थ्य प्रत्येक व्यक्तींत असल्यामुळें आपापलें हित साधण्याचा प्रयत्न करण्याचें स्वातंत्र्य प्रत्येकास असणें आवश्यक आहे; अशा प्रकारच्या प्रयत्नांतूनच अधिकांत अधिक सामाजिक हित देखील साध्य होईल हा विचार अर्थकारणांत त्याच काळांत प्रभावी झाला. स्वार्थप्रेरित प्रयत्नांतूनच सर्वार्थ साधतो, व्यक्तीचें हित आणि सामाजिक हित यांत संवादित्व आहे हीच कल्पना उगवत्या भांडवलशाहीचें मूलभूत प्रमेय होय. सरंजामशाहींतील सामाजिक स्थानपरत्वें निर्णीत होणारे आर्थिक









अनुक्रमणिका

संबंध नाहींसें होऊन त्यांऐवजीं स्वतंत्र व्यक्तींचे स्वार्थप्रेरित प्रयत्नांतून ठरणारे संबंध निर्माण झाले. स्वार्थाला प्राधान्य मिळाल्यामुळें, सामाजिक हित व्यक्तीच्या स्वार्थावर अवलंबून आहे या मतास मिळालेल्या मान्यतेमुळें, संचयवृत्ति हा भांडवलशाहींतील माणसाचा महत्त्वाचा गुण बनला. स्पर्धा हेंच त्याच्या व्यवहाराचें स्वरूप झालें आणि ती स्पर्धा यशस्वी व्हावी याकरितां तंत्रविज्ञानविषयक कार्यक्षमतेला महत्त्व आलें. आपल्या विरोधकापेक्षां अधिक कार्यक्षमतेनें म्हणजेच कमी खर्चानें उत्पादन केल्यावांचून आणि त्यासाठीं नवे नवे, अधिकाधिक कार्यक्षम उत्पादन-मार्ग शोधून काढल्यावांचून स्पर्धेत यश मिळणें कठिण ! अशा रीतीनें अधिकांत अधिक सामाजिक हित साध्य करूं शकणाऱ्या अर्थव्यवस्थेंत विकासाची, प्रगतीची देखील हमी मिळाली आणि त्या अर्थव्यवस्थेच्या भवितव्याविषयीं आशा निर्माण झाली.

अशा प्रकारें सामाजिक स्थैर्य कायम राखून आवश्यक वाटतील ते बदल घडवून आणतां येण्यासारखी राज्यव्यवस्था, आणि सामाजिक हित साधील व त्याबरोबरच सातत्यानें प्रगतीहि करूं शकेल अशी अर्थव्यवस्था आपण शोधून काढल्यामुळें अमर्याद विकासाचा मार्ग आतां खुला झाला आहे अशी एकोणिसाव्या शतकांतील माणसाची कल्पना होती. तथापि गेल्या पन्नासपाऊणशें वर्षांतील प्रत्यक्ष अनुभवानें हें स्वप्न विरून गेलें आहे. हा अनुभव आणि त्यांतील वरील अपेक्षेला धक्का देणाऱ्या घटनांची परंपरा सर्वांच्या परिचयाची आहे. तिचा विस्तारानें येथें ऊहापोह करण्याची गरज नाहीं. मात्र एक महत्त्वाची बाब नमूद करणें आवश्यक आहे. एकोणिसाव्या शतकांतील आशावादाच्या मुळाशीं असलेल्या राजकीय आणि आर्थिक प्रमेयांत आणि दृष्टिकोणांत एक प्रकारें मेळ घालतां येतो, त्यांत संवादित्व आढळतें. व्यवहार्य म्हणून प्रतिनिधिसत्तेला मान्यता देतांना राज्याच्या कार्यक्षेत्राला अगदीं निरुंद स्वरूपाच्या मर्यादा घालणारी राजकीय विचारसरणी आणि आपापलें हित साधण्यासाठीं म्हणजेच पर्यायानें सामाजिक हिताच्या पूर्तीसाठीं आर्थिक व्यवहारांत स्वातंत्र्य असावें, राज्याचा हस्तक्षेप मुळींच होतां कामा नये हा अर्थकारणांतील विचार हीं परस्पराशीं सुसंबद्ध आहेत. गेल्या शंभर वर्षांतील अनुभवाचा वारसा म्हणून आज चालूं राजकीय आणि आर्थिक आंदोलनें आणि त्यांच्या मुळाशीं असलेले विचार यांच्यांत अशी सुसंबद्धता आढळते कीं काय हें तपासून पहाणें जरूर आहे. समाजरचनेच्या निर्मितीच्या दृष्टीनें त्या काळापेक्षां आपण कितीतरी पुढें आहोंत, केवळ नवें निर्माण करण्याचा आपला अधिकार आहे एवढा दावाच न करतां हेतुपुरस्सर नवनिर्मिति करण्याची कला आपण साध्य केली आहे, असें अनेकदां म्हटलें जातें. हें कितपत यथार्थ आहे हा एक प्रश्नच आहे. पण जर तें खरें असेल तर त्यामुळ वर उल्लेख केलेल्या स्वरूपाच्या तपासणीची आवश्यकता कितीतरी वाढते यांत संशय नाहीं.

## राज्यसंस्थेला शरण गेलेला दुर्बल नागरिक

प्रातिनिधिक लोकशाहीचा विकास समाजांतील निरनिराळ्या गटांना मतदानाचा हक्क मिळत गेल्यानें झाला. हा हक्क म्हणजे आपले विशिष्ट हितसंबंध सुरक्षित ठेवण्याचें महत्त्वाचें साधन होय हा तद्विषयक अत्यन्त सामान्य समज आहे. यामुळें मतदानाच्या हक्काचें स्वरूप जों जों व्यापक होत गेलें तों तों निरनिराळ्या गटांच्या वतीनें सामाजिक व आर्थिक व्यवहारांत ढवळाढवळ करणें राज्याच्या दृष्टीनें आवश्यक व अपरिहार्य झालें. ही ढवळाढवळ सर्वस्वीं असमर्थनीय होय असें मत नव्या अर्थकारणाच्या कट्टर समर्थकांनीं वा पुरस्कर्त्यांनीं कधींहि स्पष्टपणें मांडलें नाहीं. उलट, आर्थिक व्यवहारांत स्पर्धा व तांत्रिक कार्यक्षमता यांना महत्त्व मिळाल्यामुळें आणि यंत्रविज्ञानविषयक विकासामुळें उत्पादनसाधनें बहुसंख्य जनतेच्या हातून जाऊन कांहीं अल्पसंख्यांकांच्या मालकीचीं बनलीं व त्यामुळें अत्यंत भयानक स्वरूपाच्या आर्थिक शोषणास प्रारंभ झाला आणि या शोषणापासून बचाव होण्याच्या दृष्टीनें राज्याचा हस्तक्षेप आवश्यक व समर्थनीय आहे ही कल्पना पुढें येऊं लागली. आणि या सामान्य स्वरूपाच्या हस्तक्षेपापासून सुरूं झालेलें अर्थकारण आतां, राज्यानें सारींच उत्पादनसाधनें आपल्या मालकीचीं करावींत, आणि उत्पादन, विभजन, उपभोग इत्यादि सगळेच आर्थिक व्यवहार राज्यानें नियंत्रित करावेत या आत्यन्तिक स्वरूपाच्या मर्यादेपर्यंत येऊन पोहोचलें आहे.












अनुक्रमणिका

अर्थकारणांतील या विचारांत विशिष्ट मर्यादा सोडली म्हणजे प्रतिनिधिसत्ता आणि ' जबाबदार ' राज्यपद्धति हीं देखील गैरसोयीचीं होऊं लागतात; त्यामुळें तीं नष्ट करून त्याऐवजीं राजकीय हुकूमशाही निर्माण होते. म्हणून ही विशिष्ट मर्यादा ओलांडतां कामा नये, तसें केल्यानें लोकशाही सुरक्षित राहूं शकेल हा विचार आजच्या परिस्थितीचें योग्य आकलन होण्याच्या दृष्टीनें अपुरा व ज़ुजबी स्वरूपाचा आहे असेंच म्हटलें पाहिजे. कारण त्या योगानें परिस्थितीचें यथार्थ आकलन होऊं शकत नाहीं. वैयक्तिक प्रयत्नांतून सामाजिक हिताला बाध येतो हें पाहतांच सामाजिक हिताच्या रक्षणार्थ राज्यसंस्थेकडे वळलेला मनुष्य हाच आजच्या राजकीय अरिष्टांचा निर्माता होय; कार्ल मार्क्स नव्हे.

वरील विधान सकृद्दर्शनीं थोडेसें चमत्कारिक वाटण्याचा संभव आहे. परंतु थोडासा काळजीपूर्वक विचार केल्यास त्याचा अर्थ ध्यानांत आल्यांवाचून रहाणार नाहीं. सामाजिक हिताच्या रक्षणासाठीं राज्यसंस्थेकडे किंवा राज्याकडे वळणें याचा अर्थ एक तर वैयक्तिक हित आणि सामाजिक हित यांमध्यें विरोध आहे हें मान्य करणें होय. सत्तेवांचून स्वार्थ हा परार्थाशीं अविरोधी होऊंच शकत नाहीं हीच कल्पना त्यांत आहे. प्रातिनिधिक लोकशाहीला पूरक ठरलेल्या आर्थिक दृष्टिकोणाच्या अगदीं विरुद्ध असाच हा दृष्टिकोण आहे. आणि त्यामुळें व्यक्ति वा सामाजिक पेशी यांत बदल करीत करीतच सामाजिक बदल घडवून आणला पाहिजे या विचाराला बगल दिली गेली आणि सामाजिक रचने-(structure)मध्यें बदल राज्यद्वाराच होऊ शकतो, बदल करण्याचा तोच राजमार्ग होय ही कल्पना ठाम झाली. मतदानहक्काला व्यापक स्वरूप प्राप्त होण्याच्या काळांतील मनोवृत्ती याच कल्पनेला पोषक स्वरूपाच्या होत्या. कार्ल मार्क्सनें देखील हीच कल्पना अधिक व्यापक, विस्तृत व शास्त्रीय दिसणाऱ्या स्वरूपांत पुढें मांडली आणि संभाव्य व्यावहारिक अडचणींतून पुढें जाण्याची वैचारिक तरतूद त्यानें करून दिली असें म्हणतां येईल. अर्थकारणाला गेल्या शंभर-सव्वाशें वर्षांत मिळालेलें हें वळण तात्त्विक दृष्ट्या लोकशाहीविरोधी स्वरूपाचेंच आहे. प्रातिनिधिक लोकशाहींत मुळांतच असलेला सत्तेच्या केंद्रीकरणाचा धोका त्यामुळें कितीतरी पटींनीं वाढला आहे; आणि त्याबरोबरच सामान्य माणसाची आत्मविश्वासशून्यता, असहायताहि वाढत आहे. इतिहासांतील कोणत्याहि हुकूमशहाच्या हातीं नव्हती इतकी सत्ता आजच्या लोकशाहींतील पंतप्रधानाच्या हातांत आढळते या सिडने हूकच्या विधानांतील मर्म हेंच आहे. याचीच दुसरी बाजू म्हणजे आशेनें परंतु असहायतेनें मतदान करणारा नागरिक होय. स्वतंत्र झाल्यामुळें तो एकाकी पडला आहे आणि राज्य, पक्ष वा तत्सम अन्य समुदायवादी संघटनांना शरण जाण्याच्या मनोवृत्तीनें पछाडला गेला आहे. सामान्य नागरिकाच्या ठिकाणीं आपल्या स्वतंत्र अस्तित्वाचा व कर्तृत्वाचा प्रयत्न नाहिंसा झाला आहे आणि त्यामुळें तो बिचारा सर्व सामाजिक व्यवहाराच्या आकलनाविषयीं उदासीन बनला आहे. सामान्य नागरिकाचें हें दौर्बल्य हेंच आजच्या लोकशाहीचें खरें दौर्बल्य आहे. केंद्रीभूत सत्ता नाहींशी केल्यावांचून हें दौर्बल्य नष्ट होणें अशक्य आहे.

## साम्यवादाचा हातभार !

हें दौर्बल्य निर्माण होण्यांत व कायम राहाण्यांत साम्यवादानें फार मोठा हातभार लावला आहे यांत शंका नाहीं. अपवाद म्हणून मान्य झालेल्या राज्याच्या हस्तक्षेपाचें कांहीं इष्ट स्वरूप दिसूं लागल्यानंतर साम्यवादानें लगेच, राज्याचा हस्तक्षेप अपरिहार्य आहे, अशी आवश्यकता प्रतिपादन करून व्यापक स्वरूपांत आढळणाऱ्या सामाजिक प्रतिक्रियेचा पुरस्कार केला आणि ज्या दलित जनतेला अशा हस्तक्षेपाची दैनंदिन जीवनांत गरज वाटत होती तिचें वैचारिक नेतृत्व स्वतःकडे घेतलें. साम्यवाद प्रभावी होण्याचें हेंच महत्त्वाचें सामाजिक कारण होय असें म्हणतां येईल. नेतृत्व हातीं घेतांना साम्यवादी विचारसरणींतील राज्याच्या करावयाच्या ढवळाढवळीचें स्वरूप विस्तृत व सखोल झालें. सर्व उत्पादनसाधनांवरील खाजगी मालकी नष्ट करणारी, आर्थिक व्यवहाराचा कायापालट करणारी ती ढवळाढवळ असल्यानें, प्रतिनिधित्व, मतभेद, विरोध, विविध गटांच्या हितसंबंधांची जपणूक करण्याची कल्पना इत्यादि विचारांचें तिला वावडें असणें स्वाभाविक होतें. विशिष्ट प्रकारचा बदल परिणामकारक रीतीनें घडवून आणावयाचा म्हणजे त्यासाठीं सत्तेचा उपयोग करणारीं माणसें एकाच विचाराचीं, एकदिलाचीं, एकजिनसी








स्वरूपाचीं असणें आवश्यक आहे. अशीं माणसें विशिष्ट वर्गांतच आढळूं शकतात या कल्पनेमुळें साम्यवादानें वर्गीय हुकूमशाहीचा पुरस्कार केला. तथापि राज्यानें सर्व आर्थिक व्यवहार चालवावा असें सांगणारा साम्यवाद देखील राज्यसत्तेविषयींच्या लोकशाहींतील आरंभींच्या विरोधी दृष्टिकोणासून मुक्त होऊं शकला नाहीं. "राज्यसंस्था असेल तेथें व्यक्तिस्वातंत्र्य असूं शकत नाहीं; व्यक्तिस्वातंत्र्य असावयाचें म्हणजे राज्यसंस्था असतां कामा नये" ही कार्ल मार्क्सची उक्ति प्रसिद्धच आहे. आणि यामुळें साम्यवादी आदर्शात राज्यसंस्था विलयाला जाण्याच्या कल्पनेला स्थान मिळालें; आणि व्यक्तिस्वातंत्र्याच्या पुरस्कर्त्यांना देखील त्याविषयीं आकर्षण निर्माण झालें. हुकूमशाही ही 'खरी', 'नवी' वा 'जनतेची' लोकशाही वाटूं लागली. आजच्या जगापुढें साम्यवाद हा केवळ वैचारिक स्वरूपांतच राहिलेला नाहीं; प्रचंड सामाजिक प्रयोगाच्या रूपानें त्याचें दर्शन जगाला आतां झालें आहे. आणि सामाजिक वा आर्थिक समता, न्याय, सुरक्षितता याऐवजीं सर्वंकष स्वरूपाच्या हुकूमशाहीचा प्रत्यय त्या प्रयोगावरून आला आहे. सत्तेच्या साहाय्यानें समता, सामाजिक न्याय प्रस्थापित करतां येतात, नवसंस्कृति वा नवें जीवन निर्माण होऊं शकतें ही समजूत किती फोल आहे हें आतां स्पष्ट झालें आहे. रशियन समाजाच्या जुन्या स्वरूपांतच कायम राहिलेल्या पेशींनीं या नव्या विचारसरणीच्या पुरस्कर्त्यांना राष्ट्रवादापुढें, धर्मापुढें, जुने झार आणि त्यांचे सेनानी यांच्यापुढें कुर्निसात करावयास भाग पाडलें आहे!

## मिश्र अर्थव्यवस्था आणि कल्याणकारी राज्य

उत्पादनसाधनांवरील समाजाच्या किंवा राज्याच्या मालकीच्या आधारावर जो उपरिनिर्दिष्ट सामाजिक पुनर्रचनेचा प्रयोग होत आहे त्याच्या अनुभवावरून अन्यत्र सावधपणाची प्रतिक्रिया निर्माण होणें स्वाभाविक होतें. तथापि या सावधगिरींतून निर्माण होणारे पर्याय साम्यवादी प्रयोगांतील धोका टाळूं शकतात कीं काय हा खरा प्रश्न आहे. केवळ राज्याच्या मालकीचें क्षेत्र मर्यादित केल्यानें हा प्रश्न सुटूं शकेल असें मानणारा मिश्र अर्थव्यवस्थेचा मार्ग अथवा अतिरिक्त संपत्तीचा विनियोग खाजगी वैयक्तिक निर्णयावर अवलंबून न ठेवतां ती राज्याकडे घेण्याचा 'कल्याणकारी' राज्याचा मार्ग—हे दोन्हींहि मार्ग धोका टाळूं शकत नाहींत हें ध्यानांत घेतलें पाहिजे. मिश्र अर्थव्यवस्था सामाजिक हिताला पोषक करावयाची म्हणजे तिच्यांतील खाजगी उत्पादनप्रयत्नांचें विविधप्रकारें नियंत्रण करणें जरूर आहे. याचा अर्थ असा कीं मालकीऐवजीं नियंत्रणाचा मार्ग स्वीकारल्यानें नोकरशाहीची वाढ होणार व ती टाळतां येणें अशक्य आहे. एका अर्थी साम्यवादी राजवटींत निर्माण होणारी नोकरशाही आणि ही मिश्र अर्थव्यवस्थेंतील नोकरशाही यांच्यांत कोणताच महत्त्वाचा फरक नाहीं असें म्हणतां येईल. दोन्हीहि आपल्या मालकीचें जें नाहीं त्यावर नियंत्रण करणाऱ्या, अधिकार गाजवणाऱ्या नोकरशाहयाच होत; आणि ती सत्ता कायमची हातीं रहावी अशा प्रकारचे प्रयत्न दोहोंकडूनहि होणें अपरिहार्य आहे. मालकी स्वरूपाच्या भिन्नतेमुळें एकींत अरेरावी तर दुसरींत लाचलुचपतीचें प्रमाण कदाचित् अधिक आढळेल, इतकेंच! 'कल्याणकारी' राज्यासंबंधीं देखील असेंच म्हणतां येईल. सर्व अतिरिक्त संपत्ति ताब्यांत घेऊन तिच्या साहाय्यानें राज्यानें सर्व नागरिकांना वाढत्या व विविध सवलती पुरविणें ही 'कल्याणकारी' राज्याची मूलभूत कल्पना आहे. पण तर्कशुद्ध विचार करितां या कल्पनेमुळें व्यक्तीचें मतदानाचें स्वातंत्र्य कितपत कायम राहील हा एक प्रश्नच आहे. आर्थिक व्यवहार वा अतिरिक्त संपत्तीचा विनियोग यांचें नियंत्रण करण्याचा अधिकार मूठभर प्रतिनिधि आणि वाढत्या संख्येंत आढळणारा नोकरवर्ग यांच्या हवालीं केल्यानें सत्तेच्या केंद्रीकरणाची शक्यता वाढते आणि सामान्य नागरिकाचें वर उल्लेख केलेलें दौर्बल्य कायमच राहातें. साम्यवादाप्रमाणेंच हेंहि अर्थकारण केंद्रीकरणाकडेच नेणारें आहे. म्हणून त्याच्यायोगानें आधुनिक लोकशाहीचा प्रश्न सुटण्याऐवजीं अधिकाधिक गुंतागुंतीचाच होत जाईल असें म्हणण्यास हरकत नाहीं.

## आधुनिक तंत्रविज्ञानाचा एकांगी अर्थ!

येथें कांहीं महत्त्वाच्या अडचणींचें निराकरण करणें आवश्यक आहे. यांतील पहिली अडचण म्हणजे आधुनिक तंत्रविषयक होय. कांहीं विचारवंतांचें मत असें आहे कीं आधुनिक उत्पादनतंत्राचें स्वरूपच असें आहे कीं त्यामुळें केंद्रीकरण अपरिहार्य व्हावें.

हजारों लोकांचीं इकडून तिकडे नआण करणारीं वहातुकीचीं साधनें, बसल्या जागेवरून लाखों लोकांना आपलें म्हणणें सांगतां येईल असा रेडियो, लक्षावधी एकर भिजवील असें धरण, शेकडों कारखान्यांना वीजपुरवठा करणारें विद्युदुत्पादनकेंद्र इत्यादि पाहिलीं म्हणजे केंद्रीकरणाच्या कल्पनेशीं विरोध करणें हें या विचारसरणीप्रमाणें खुळचटपणाचेंच म्हटलें पाहिजे. या दृष्टिकोणाचा पुरस्कार दोन निरनिराळ्या गटांकडून केला जातो. पहिला गट केंद्रीकरण अटळ आहे असें म्हणणारांचा आणि दुसरा आधुनिक यांत्रिक उत्पादनतंत्र नको म्हणणारांचा ! तथापि या दोन्ही भूमिका मान्य करणें कठिण आहे. आधुनिक तंत्रामुळें केंद्रीकरणाची शक्यता वाढली आहे असें निर्विवादपणें म्हणतां येत नाही. केंद्रीकरणाला सहायभूत वाटणारें आधुनिक तंत्र हें परस्पर सहकार्यालाहि पोषक होण्यासारखें आहे. त्याचप्रमाणें, आधुनिक तंत्र हें माणसाच्या कर्तृत्वाचाच महान् आविष्कार असून जीवनाला अनुकूल परिस्थिति निर्माण करण्याचें कार्य त्यानें फार मोठ्या प्रमाणांत केलें आहे. तें सर्वस्वीं अनिष्ट व त्याज्य म्हणणें म्हणजे पुनः दरिद्री, खुरटलेलें, दुःखी जीवन निर्माण करण्याचा पुरस्कार करणें होय. फांशीच्या खुर्चीवरून विजेचें किंवा अणुबाँबवरून अणुशक्तीचें स्वरुप ठरविणें योग्य किंवा शहाणपणाचें द्योतक म्हणतां येणार नाहीं. तंत्रविज्ञानविषयक विकासाला जसें प्राधान्य देण्याची गरज नाहीं, तसेंच तो सर्वथैव त्याज्य मानणेंहि योग्य नाहीं. मानवी जीवनाला पोषक ठरत नसेल अशा वेळीं त्याला मर्यादा घालणें समर्थनीय होऊं शकेल. पण ही मर्यादा घालण्याची गरज आतांपर्यंतच्या अनुभवाच्या एकांगी अर्थावरुन निघतां कामा नये; किंवा त्या मर्यादांचें स्वरूपहि त्यामुळें निश्चित होऊं शकणार नाहीं.

येथवरच्या विवेचनावरून आजचीं आर्थिक आंदोलनें व त्यामागील विचार हें सर्व आजच्या राजकीय गरजेशीं बहुंशीं विसंगत आहेत हें स्पष्ट होईल. यावरुन पुनः राज्यासंबंधींच्या अभावात्मक दृष्टिकोणाचा स्वीकार करुन, राज्यानें आर्थिक व सामाजिक जीवनांत कसलीहि ढवळाढवळ करूं नये या भूमिकेचाच पुरस्कार करावयाचा काय ? अशा प्रकारची भूमिका घेऊन मुक्त साहस व स्पर्धा यांजवर आधारलेली भांडवलशाही अर्थव्यवस्थाच पुनः प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करावयाचा काय ? इतिहासाचा क्रम अशा प्रकारें मागें नेणें शक्य आहे काय ? व तसें शक्य नसल्यास केंद्रीकरण अटळ समजून तें सह्य व सर्वांच्या हिताला पोषक बनविण्याचाच प्रयत्न करणें योग्य नव्हे काय ? — अशा तऱ्हेचे प्रश्न उपस्थित होण्याचा संभव आहे. केंद्रीभूत अर्थव्यवस्थेच्या परिणामांचा अनुभव आल्यानंतर भांडवलशाही अर्थव्यवस्था हीच लोकशाहीशीं संवादी अर्थव्यवस्था होय असें म्हणण्यापर्यंत काहींची मजल गेली आहे. आणि हें म्हणणें मान्य करावयाचें म्हणजे आजवरच्या अनुभवाचीच पुनरावृत्ति होण्याचा संभव आहे.

## सहकार्यावर आधारलेलें अर्थशास्त्र

तथापि हा दृष्टिकोणहि सदोष व चुकीचा आहे असेंच म्हटलें पाहिजे. केंद्रीकरणाकडे नेणारें अर्थकारण ज्याप्रमाणें लोकशाहीचा आजचा प्रश्न सोडवूं शकत नाहीं, त्याचप्रमाणें भांडवलशाहीदेखील तो सोडवूं शकत नाहीं हें ध्यानांत घेतलें पाहिजे. आणि याचें कारण भांडवलशाही ही मूलतःच लोकशाहीविरोधी आहे हें होय. ज्या मनःप्रवृत्तींना ती उत्तेजित करते वा इष्ट समजते त्या मनःप्रवृत्ती विवेकशीलतेनें काबूंत आणण्याची खरी गरज आहे. संचयवृत्ति ही भांडवलशाही उत्पादनप्रयत्नांतील प्रेरक शक्ति आहे आणि तो एक सद्गुणहि आहे हें खरें. तथापि भांडवलशाही अर्थव्यवस्थेंत संचयाला सार्वभौमत्व प्राप्त होतें. जीवनाच्या गरजांशीं संचयाचा संबंध पूर्णपणें तुटतो. आणि त्याऐवजीं माणूस हा संचयाचें साधन बनतो. यामुळेंच स्पर्धेलाहि अवास्तव महत्व प्राप्त होतें. स्वार्थप्रेरित प्रयत्न हें स्वभावतःच अनिष्ट समजण्याचें कारण नाहीं. उलट ते स्वाभाविक होत असेंच म्हटलें पाहिजे. परंतु ते स्पर्धेच्या रूपांतच व्यक्त झाले पाहिजेत हा आग्रह मात्र बुद्धीला पटण्यासारखा नाहीं. दुसऱ्याशीं स्पर्धा केल्यानेंच स्वार्थ साधतां येतो काय ? सहकार्यातून स्वहित साधतां येऊं शकत नाहीं काय ? हें सहकार्य नेहमीं अप्रत्यक्ष स्वरूपाचें, जाणिवेवांचून निर्माण झालेलें असलें पाहिजे या म्हणण्यांत कितपत तथ्य आहे ? इतरांशीं करण्यांत येणारें हेतुपुरस्सर सहकार्य स्वातंत्र्याला विघातक ठरतें ही कल्पना चुकीची व तर्कदुष्टतेचीच द्योतक म्हटली पाहिजे. तात्पर्य, सगळ्या अर्थव्यवहाराचें अधिष्ठान म्हणून स्पर्धेला

[ पुढील मजकूर पान ९ वर पहावा. ]








श्री. माधवराव बागल

# मानवी प्रतिमा आणि शिल्पकलेंतील मूल्यें

## शिल्प आणि चित्र

शिल्पकला आणि चित्रकला या बहिणीबहिणी असल्या तरी त्यांचा पेहेराव फार निराळा आहे. एकाच मनुष्याची ओळख ( likeness ) जरी दोन्ही कलेंत आणावी लागली, तरी तें आणण्याचें साधन दोन्हींत निराळें व पाहण्याची दृष्टीहि निराळी असते.

चित्रकलेंत समोरची वस्तु बसलेल्या जागेवरून जशी दिसेल तशी काढतां येते. त्या जागेवरून उठावें लागत नाहीं. हलावें लागत नाहीं. दृष्टीहि बदलावी लागत नाहीं, ती वस्तु काय आहे, कशी आहे याचा विचार करण्याचें कारण पडत नाहीं. तिचा मूळ आकार कसा आहे, मूळ रंग कोणता आहे याचाहि विचार करावा लागत नाहीं. असतें एक, दिसतें निराळें. जवळ गेल्यानंतर पानाचा रंग हिरवागार दिसतो. त्या पानावर ऊन तळपत असल्यास लांबून पिवळा दिसतो. ढगाची सावली पडली कीं जांभळा दिसतो. क्षितिजाजवळ गेल्यास तो आकाशाच्या रंगावर जातो. त्या वस्तूच्या आकारांत आणि रंगांत वातावरणामुळें बदल होत जातो. म्हणजे चित्रकाराला दिसेल तेंच काढावें लागतें, असेल तसें नव्हे. याउलट, शिल्पकाराला ( रिलीफ खेरीज ) असेल तें काढण्याचा प्रयत्न करावा लागतो, तसा आभास निर्माण करावा लागतो.

चित्रकाराला बसल्या जागेवरून एकच कान दिसेल. एकच डोळा, एकच बगल दिसेल. याउलट पुरी शिल्पप्रतिमा काढावयाची झाल्यास शिल्पकाराला सर्वच बाजू काढाव्या लागतात. म्हणून सर्व बाजू त्या वस्तूभोवतीं फिरून पहाव्या लागतात. शिल्पकार लांबी रुंदी उंची जवळ जाऊन मोजूं शकतो. त्याला त्या मनुष्याच्या अवयवाचीं मापें घेतां येतात.

छाया, प्रकाश व रंग यांचे परिणाम शिल्पकाराला दाखवतां येत नाहींत. त्याची साधनसामग्री या दृष्टीनें कोती पडते. कांहींतरी रंग दिल्यास तें चांगलें दिसत नाहीं. ब्राँझ किंवा संगमरवरी दगडाचा रंग जो असेल तोच राखला जातो.

## ईजिप्तची शिल्पकला

चिखल हातीं लागला म्हणजे लहान मुलें न शिकवतांच समोर दिसणाऱ्या माणसाच्या, बैलाच्या, घोड्याच्या वगैरे प्राण्यांच्या आकृती तयार करीत असतात. मनुष्यांत ही जी एक उपजत वृत्ति आहे तींतूनच शिल्पकलेचा जन्म झाला आहे. ठराविक ओळख (likeness) ठेवून बारीक खांचाखोचा टाकीत असतांना मानवाला कांहीं सर्वसाधारण कलामूल्यें सांपडलीं. हीं मूल्यें लहान मुलांच्या कामांतूनहि त्याला शोधतां आलीं. रचनाशास्त्रांतील कांहीं ठोकताळे बसवता आले.

ईजिप्तच्या शिल्पकारांनीं याबाबत आघाडी मारली. ईजिप्तच्या शिल्पकलेचें वैशिष्ट्य म्हणजे ती शिल्पकला साधनालाच विशेष जखडली गेली. ईजिप्तनें शिल्पासाठीं साधनांचा उपयोग करण्याऐवजीं, साधन पाहून त्या साधनाला साजेशी कला निर्माण केली. आयत्याच पडलेल्या प्रचंड फत्तरांना व कणखर दगडांच्या टेकड्यांनाच त्यांनीं मानवी आकृतीचें स्वरूप दिलें. साधनांच्या अतिभव्य व्याप्तीमुळें त्यांच्या कलेंत साधेपणा व भव्यता आपोआपच आली. विशिष्ट भावना दाखविणाऱ्या भव्य आकृती त्यांनीं तयार केल्या. सबंध कादंबरीचा सारांश चार वाक्यांत सांगावा त्याप्रमाणें त्या आकृती म्हणजे शिल्पकारानें सारांशानें प्रकट केलेलें आपलें मनोगत होय. व्यक्तिवैशिष्ट्याहून त्यांनीं गुणवैशिष्ट्यावरच भर दिला. भावना दाखविण्याकरतां मानवी आकृतीचें त्यांनीं साहाय्य घेतलें. गूढता, भयानकता, राग सहनशीलता या भावनांना त्यांनीं जडांत बांधून टाकलें. रहस्यमय ‘ स्फिंक्स ’ ही त्यांची अद्‌भुत आणि अचाट शिल्पकृति होय.

या कलेचा अगदीं आधुनिक युरोपीय शिल्पकारावरहि बराच परिणाम झाला. एपस्टीन् या शिल्पकारानें शॉ, टागोर वगैरेंचे पुतळे या तंत्राला धरून केले आहेत. करमरकरांच्या स्टुडियोमध्येंहि या पद्धतीचे








एकदोन पुतळे पाहण्यांत आले. अर्थात् अशीं सर्व कामें हीं स्मारकवजाच असतात.

## बदलत्या कातडीच्या आंतील सांगाडा

याच शिल्पकलेंतील छोट्यामोठ्या मानवी अर्धप्रतिमा (बस्ट्स) तयार करतांनाहि कांहीं कलामूल्यें सांभाळावीं लागतात. माणसाची त्यावेळची ओळख (likeness) आणि त्या व्यक्तीचें वैशिष्ट्य सतत राखणाऱ्या गोष्टी कोणत्या याचाहि शिल्पकारानें विचार केला पाहिजे.

मनुष्य तोच असूनहि त्याची ओळख बदलूं शकते. त्याच्या चेहऱ्यांत बदल होत असतो. ठराविक वाढ झाल्यानंतरहि अनेक कारणांनीं चेहऱ्यांत फरक पडतो. आजारामुळें बदल होतो, अति-स्थूलपणानें होतो, काळजीनें होतो. आपण बऱ्याच दिवसांनीं आपल्या एखाद्या मित्राला पाहिलें म्हणजे म्हणतों: 'अरे, मी तुला ओळखलें सुद्धां नाहीं, केवढा बदल झाला आहे तुझ्यांत ?'. मनुष्य तोच असूनहि त्याच्या वरच्या मांसल आवरणांत हा बदल झाल्यामुळें ओळख पटेनाशी होते. पण ज्या मांसल भागानें आंतली कवटी झांकलेली असते त्यांत ठराविक वाढ झाल्यानंतर बदल होत नाहीं. रुंदट चेहरा, लांबट चेहरा त्या आंतल्या कवटीवर (मूळ रचना किंवा structure वर) अवलंबून असतो. रोगी-निरोगीपणाचा परिणाम त्यावर होत नाहीं. स्नायूंची ताकद कमी झाल्यास देहाला बांक येईल. मान वांकेल पण चेहऱ्याची कवटी तीच राहील. म्हणून या बदलत्या कातडीच्या आंतील सांगाड्याची कल्पना शिल्पकाराला बरोबर असावी लागते. आंतील सांगाडा (Skeleton) ठराविक प्रमाणांनीं बांधला गेलेला असतो. त्याचा अभ्यास नसल्यास तंत्रशुद्ध दृष्ट्या निर्दोष कलाकृति तयार करतां येत नाहीं.

मनुष्य जिवंत असेपर्यंत त्याची ओळख अत्यंत महत्त्वाची असते. पण ती पिढी गेल्यानंतर त्या प्रतिमेकडे ती एक मनुष्याकृति म्हणूनच पहिली जाते आणि त्या कलेंतील गुणदोषांची छाननी त्यावेळचे तंत्रविशारद कलावंत करीत असतात. यावेळची दृष्टि, मांसलभागाखालचा सांगाडा प्रमाणबद्ध आहे कीं नाहीं, हें पाहण्याकडेच वेधली जाते. न बदलणाऱ्या अशा कांहीं कायमच्या मूल्यांकडेच पाहिलें जातें.

यानंतर मनुष्याच्या चेहऱ्यावर (मांसलभागावर) दिसणाऱ्या क्षणिक भावना आणि स्वभावविशेष इकडे कलावंताला विशेष लक्ष द्यावें लागतें. मनुष्याची खरी ओळख क्षणिक भावनेच्या पडसादाहून त्याच्या स्वभावानें अधिक पटते. कारण स्वभाव हा कायम स्वरूपाचा असतो. भावना या तात्कालिक स्वरूपाच्या असतात. हें न समजणारा फोटोग्राफर फोटोला बसलेल्या मनुष्याला म्हणतो: 'आंता जरा हंसा'. आणि त्या चेहऱ्यावर तें कृत्रिम हास्य आलें कीं त्याला समाधान होतें. पण त्या माणसाचा हा स्वभावविशेष नव्हे. शिल्पकार त्या माणसाची ओळख शिल्पाकृतींत आणतांना अशा क्षणिक भावनांना महत्त्व देत नाहीं.

हास्य दुःख, निराशा, राग, प्रेम या भावनांचेंच ज्या वेळीं चित्रीकरण असेल त्या वेळीं मग त्या माणसाच्या ओळखीला (likeness ला) कांहीं महत्त्व नाहीं. भावनेला महत्त्व आहे. मग त्या भावना पकडण्याचाच तो प्रयत्न करीत असतो. पण ज्यावेळीं एकाद्याचा चेहरा नेहमी हंसरा, नेहमी दुःखी, नेहमी रागीट, शांत, कामुक असा असतो त्यावेळीं मात्र त्या माणसाची ओळख आणि अंतरंग या दोन्हीहि गोष्टी चेहऱ्यावर आणण्याची कलावंत खटपट करतो. कारण हा त्याचा स्वभावविशेष असतो.

## अर्धपुतळा व पुरी आकृति

शिल्पकारानें अर्धपुतळा तयार केला तरी त्या अर्धपुतळ्यावरून व त्या खालच्या चबुतऱ्यावरुन माणसाची जाडीजुडी व उंचीहि दाखवितां येणें शक्य असतें. केस पांढरे-काळे, पातळ-जाड, हें त्याच्या हस्तकौशल्यानें दाखवता येतें. त्या माणसाची जाडी-जुडी व उंची चबुतऱ्याच्या जाडीजुडीवरून व उंची-वरून सूचित करतां येते. हे नियम चांगला शिल्पकार अनुभवानें जाणूं शकतो. म्हणून एकाद्या माणसाचा बस्ट काढतांना या सर्व मूल्यांचा समावेश होईल तीच उत्कृष्ट कलाकृति ठरे.

ओळख (likeness) ही तर असलीच पाहिजे. त्या खेरीज त्याच्या मित्रांना व आप्तांना इतर गुण असूनहि त्यांत आपुलकी वाटणार नाहीं. पण निर्दोष कलाकृति आंतील सांगाड्याच्या ज्ञानाशिवाय बरोबर वठत नाहीं. सादृश्य किंवा ओळख, मूळ शारीरिक बांधा किंवा (structure) आणि कवटीचें ज्ञान








हें साधून जर त्याचे स्वभावविशेष साधले नाहींत तर ती प्रतिमा कलावंताच्या दृष्टीनें हिणकसच ठरते. ऐतिहासिक दृष्ट्या या स्वभावविशेषांना फार महत्त्व आहे. कारण, त्याखेरीज त्याचें चरित्र, त्याचें जीवन कशा प्रकारचें होतें हें प्रतिमेनें समजणार नाहीं.

शिल्पकारानें किंवा कोणत्याहि कलावंतानें हातीं घेतलेलें काम केव्हां संपवावें हेंहि समजणें अवघड आहे. कारण, कलाकार हा नेहमीं प्रत्यक्षाचा आभासच निर्माण करीत असतो. अगदीं बरहुकूम म्हणजे असेल तशी प्रतिकृति निर्माण करणें ही गोष्ट मनुष्याच्या आवांक्या-बाहेरची आहे. आहे तसें काढण्याचा कोणी प्रयत्न करूं लागल्यास त्याला दहा जन्महि पुरे होणार नाहींत! आणि पुनः तें काम त्या दृष्टीनें अपुरें राहील तें निराळेंच. डोक्याचे केस आहेत तितके, झाडाचीं पानें असतील तितकीं दाखविण्याचा प्रयत्न अशक्य कोटींतलाच आहे. म्हणून कोणतीहि कला असो ती निसर्गाचा आभासच निर्माण करणार. आणि आभास अत्यंत थोड्या श्रमांत, समाधानकारक रीतीनें दाखवील तो कलाकार मोठा. चित्र केव्हां संपवायचें व कसें संपवायचें हें ज्ञान नवशिक्या चित्रकाराला नसल्यामुळें तो नुसता गोंधळ निर्माण करतो. कष्टालाहि मर्यादा आहे. कलेच्या मूल्यांपैकीं हें अतिमहत्त्वाचें असें मूल्य आहे. म्हणून कलावंताला योग्य वेळीं आपल्या कामावर निर्बंध घालावे लागतात. शिल्पप्रतिमेचीं तिचा दर्जा ठरविणारीं आवश्यक मूल्यें म्हणजे निर्दोष मानवी आकृति, अचूक ओळख (likeness) आणि स्वभावविशेष हीं होत.

---

## आजच्या आपल्या ध्येयसृष्टींतील एक अंतर्विरोध ( पान ६ वरून पुढें चालू )

मान्यता देण्यांत आणि सामाजिक जीवनांतील अधिक मूलभूत स्वरूपाचें सहकार्याचें तत्त्व हें अप्रत्यक्षपणेंच अंमलांत आलें पाहिजे असा आग्रह धरण्यांत भांडवल-शाही विवेकापासून ढळते आणि परिणामीं मानवी स्वातंत्र्याला विघातक ठरते असेंच म्हटलें पाहिजे. सहकार्यावर आधारलेलें अर्थकारण हेंच स्वातंत्र्याशीं, लोकशाहीशीं संवादी स्वरूपाचें अर्थकारण होय. राज्य-सत्ता अधिकाधिक वाढविण्याचा आजच्या आर्थिक आंदोलनांचा ओघ सहकार्याधिष्ठित अर्थकारणच रोखूं शकेल. आर्थिक जीवनांत निर्माण झालेली असहायता नष्ट करण्याचें सामर्थ्य सहकार्यांतच असून समाज-पेशींचें स्वरूप बदलत बदलत समाजरचना बदलण्याची कल्पना त्यांत असल्यामुळें तें लोकशाहीसहि पोषक आहे. पण अशा स्वेच्छाजन्य आर्थिक प्रयत्नांचा पुरस्कार करा-वयाचा म्हणजे राज्यसत्तेविषयीं संशयाचा वा विरोधाचा दृष्टिकोण स्वीकारावयाचा असें नव्हे. राज्याविषयीं अभावात्मक कल्पना मान्य करण्याचीहि त्यासाठीं गरज नाहीं. सहकारी प्रयत्नांत सुसूत्रता निर्माण करण्याचें आणि जेथें ते प्रयत्न अशक्य वा अव्यवहार्य असतील तेथें त्यांना पोषक होईल अशा स्वरूपांत प्रत्यक्ष कार्य कर-ण्याची जबाबदारी राज्यावर राहिलीच पाहिजे. राज्यानें सामाजिक व्यवहारांत हस्तक्षेप करावा कीं नाहीं असा प्रश्न नाहीं. हस्तक्षेपामुळें ज्याप्रमाणें स्वातंत्र्याला मुरड घातली जाते त्याप्रमाणेंच तो न केल्यामुळेंहि कित्येकदां स्वातंत्र्य धोक्यांत येतें. तथापि या जाणिवें-तून जन्मलेले वैयक्तिक वा स्वेच्छाजन्य प्रयत्न हे नेहमीं सामाजिकहितविरोधी स्वरूपाच्या स्वार्थानें प्रेरित झालेलेच असणार आणि सामाजिक हित हें राज्यानें लादलें तरच साध्य होणार ही विचारसरणी मात्र पूर्ण चुकीची म्हटली पाहिजे. तिच्यामुळें निर्माण होणारीं माणसें लोकशाहीचें रक्षण करूं शकणार नाहींत. तीं आज ना उद्यां या ना त्या अर्थानें लोकशाहीस मारकच ठरतील. आजच्या लोकशाहीचा प्रश्न केवळ आर्थिक आंदोलनांतील दृष्टिकोण बदलल्यानें पूर्णपणें सुटेल असें येथें सूचित करावयाचें नाहीं. राजकीय आणि आर्थिक ध्येयसृष्टींतील एका अत्यंत महत्त्वाच्या अंतर्विरोधाचेंच केवळ दिग्दर्शन करावयाचें आहे. राजकारण आणि अर्थकारण अशा प्रकारें परस्परविरोधी ध्येयांच्या दिशेनें गेल्यास आज आढळणारा गोंधळ अधिकाधिक वाढ-ण्याचा संभव आहे. हा अंतर्विरोध नाहींसा करणें ही लोकशाहीच्या भवितव्याच्या दृष्टीनें एक अत्यंत मह-त्त्वाची गरज आहे.

---








श्री. म. वि. भिडे

# गुरु गोविंदसिंग

**गुरु गोविंदसिंग** (इ.स. १६७५–१७०८) ह्यांचा जन्म बिहार प्रांतांत पाटणा येथें इ. स. १६६६ मध्यें झाला. ह्यांचें मूळचें नांव गोविंदराय असून त्यांची बालपणचीं कांहीं वर्षे पाटणा येथें गेलीं. गोविंदसिंग हें नांव त्यांनीं पुढें शीख धर्माला नव स्वरूप दिलें त्यावेळीं धारण केलें. इतिहासांत ते गोविंदसिंग ह्या नांवानेंच प्रसिद्ध आहेत.

गोविंदसिंग हे पंजाबांत इ. स. १६७३ मध्यें येऊन आपले पिता गुरु तेग बहादर ह्यांच्यापाशी आनंदपूर मुक्कामीं राहूं लागले. पण पुढें लवकरच म्हणजे इ. स. १६७५ मध्यें गुरु तेग बहादर ह्यांचा वध झाला. गुरु तेग बहादर ह्यांनीं मरणापूर्वीं दिलेल्या आज्ञेप्रमाणें गोविंदसिंग हे त्यांच्यामागून गुरुपदावर आरूढ झाले.

## सैन्यसामग्रीची जोड

गोविंदसिंगांना गुरुपद प्राप्त झालें त्यावेळीं त्यांचें वय अवघें ९ वर्षांचें होतें. तथापि त्यांची बुद्धि उत्तम प्रकारची असून वयाच्या मानानें त्यांचें शिक्षण चांगलें झालेलें होतें. त्यांना गुरु ग्रंथसाहेब मुखोद्गत असून संस्कृत व फारसी भाषांचें पण त्यांना चांगलें शिक्षण दिलेलें होतें. गुरु तेग बहादर ह्यांचा जो अमानुष रीतीनें वध झाला त्यामुळें त्यांच्या कोंवळया मनास जबर धक्का बसला व तेव्हांपासून मुसलमानांच्याकडून होत असलेल्या आपल्या बांधवांच्या जुलुमाचा प्रतिकार कसा करावा ह्याबद्दल त्यांच्या मनांत विचार घोळूं लागले. त्यांना लहानपणापासून मर्दानी खेळ, धनुर्विद्या, शिकार वगैरेचा नाद असे. त्यामुळें स्वसंरक्षणार्थ शस्त्रास्त्रें व सेना वाढविण्याकडे साहजिकच प्रथम त्यांचें लक्ष गेलें. गुरु हर गोविंद ह्यांनीं ह्या गोष्टींचा उपक्रम केलाच होता. परंतु पुढील तीन गुरूंच्या आमदानींत निरनिराळया कारणांनीं ह्या गोष्टींकडे विशेष लक्ष दिलें गेलें नाहीं. गुरु गोविंदसिंग गादीवर आल्यावर त्यांनीं लवकरच आपल्या अनुयायांना अशी आज्ञा केली कीं गुरूंना त्यांच्या शिष्याकडून जी वेळोवेळीं 'गुरुदक्षिणा' येत असे ती शस्त्रास्त्रें, घोडे वगैरे सैनोपयोगी सामग्रीच्या रूपानें आली तर तिचा आनंदानें स्वीकार केला जाईल. त्यामुळें अशा तऱ्हेची सामग्री त्यांना बरीच मिळूं लागली. शिवाय ते स्वतः जात्याच शूर व पाणीदार वृत्तीचे असल्यामुळें तरुणांना त्यांच्याबद्दल आदर वाटे व त्यामुळें तरुण सैनिकांची त्यांच्या सैन्यामध्यें झपाट्यानें वाढ होऊं लागली.

गुरु गोविंदसिंग ह्यांना काव्य व कला ह्यांची गोडी असल्यामुळें त्यांच्याभोंवतीं विद्वान् मंडळी बरीच असत. त्यामुळें त्यांच्या बुद्धीच्या विकासास व ज्ञानवृद्धीस मदत झाली. गुरु गोविंदसिंग हे वेळोवेळीं दरबार वगैरे भरवून आपल्या शिष्यमंडळास दर्शन देत व उपदेश करीत असत. गुरु गोविंदसिंग ह्यांचा एकंदर दरबारी थाट व त्यांच्या सैनिकांची वाढ ह्या गोष्टींमुळें शेजारच्या कांगडा प्रांतांतील रजपूत राजांना त्यांचा मत्सर व भीति वाटूं लागली. त्यांपैकीं भीमचंद नांवाच्या एका राजानें कुरापत काढून त्यांच्याशीं वैर उत्पन्न केलें. गुरु गोविंदसिंग ह्यांच्या कांहीं इष्टमित्रांनीं त्यांना, शेजारच्या राजांशीं वैर उत्पन्न होणें चांगलें नाहीं, गुरूंनीं फक्त धर्मोपदेशाचें काम करावें असा उपदेश केला. परंतु गुरूंनीं उत्तर दिलें कीं "मी कोणाशी वैरभाव धरीत नाहीं; पण माझ्याशी जे वैर करतील त्यांचा प्रतिकार करण्यास माझे शीख समर्थ आहेत." पुढें लवकरच एका रजपूत राजाशीं युद्धाचा प्रसंग आला, व त्यावेळीं गुरूंच्या सैन्याला मिळालेल्या जयामुळें गुरुंच्या वरील उत्तराची सत्यता दिसून आली व त्यांना व त्यांच्या सैनिकांना आत्मविश्वास उत्पन्न होऊन जास्तच हुरूप वाटूं लागला.

## 'खालसा' धर्माची स्थापना

गुरु गोविंदसिंग हे दूरदर्शी असल्यामुळें नुसत्या

---

शीखांचे शेवटचे गुरु **गुरु गोविंदसिंग** यांची जयन्ती येत्या पौष शु. ७ ला म्हणजे जानेवारी ११ ता. ला येत आहे. त्या निमित्तानें श्री. म. वि. भिडे आय्. सी. एस्. यांनीं करून दिलेला गुरु गोविंदसिंग यांचा प्रस्तुत चरित्रपरिचय वाचकांस समयोचित व उद्बोधक वाटेल— का. सं.








सैन्यसामग्रीनें आपलें इच्छित कार्य साध्य होणार नाहीं हें लवकरच त्यांच्या लक्षांत आलें. गुरु नानक ह्यांनीं एकेश्वरी मार्गाचा व विश्वबंधुत्वाचा उपदेश केला होता. तरी त्यांनीं हिंदु समाजव्यवस्थेच्या ऐवजीं निराळी समाजव्यवस्था स्थापन करण्याचा प्रयत्न केला नव्हता. त्यामुळें जातिभेद, संस्कार वगैरे शीखांनीं मानूं नयेत असा जरी गुरु नानक ह्यांचा उपदेश होता तरी पुष्कळसे शीख हिंदूंचे, धार्मिक रीतिरिवाज म्हणजे जन्म, विवाह व मृत्यु ह्यासंबंधींचे संस्कार पाळीत व त्यांच्यामध्यें व्यवहारांत जातिभेद पण मानला जात असे. ह्या सर्व परिस्थितीचा विचार करतां, मुसलमानांशीं टक्कर द्यावयाची असेल तर शीख लोकांमध्यें एकराष्ट्रीयत्वाची भावना प्रथम उत्पन्न करणें आवश्यक आहे ह्या गोष्टीची गुरु गोविंदसिंग ह्यांच्या मनास खात्री पटली. ही गोष्ट कशा रीतीनें साध्य करावी ह्याबद्दल त्यांनीं बरींच वर्षें विचार केला. शेवटीं त्यांनीं शीख धर्माला विशिष्ट स्वरूप देऊन त्यांच्यामध्यें एकत्वाची भावना व क्षात्रवृत्ति उत्पन्न होईल अशा प्रकारचा 'खालसा' म्हणून नवा धर्म स्थापन करण्याचें ठरवलें व त्याकरितां आपल्या शिष्यवर्गाची केशगड येथें इ. स. १६९९ च्या सुमारास एक सभा बोलाविली.

गुरु गोविंदसिंग ह्यांनीं आपल्या नव्या धर्माच्या स्थापनेचा समारंभ मोठ्या थाटानें व आपल्या शिष्यांच्या मतावर त्याचा योग्य व दृढ परिणाम व्हावा अशा रीतीनें केला. ह्या प्रसंगीं प्रथम ते जमलेल्या मंडळींच्या पुढ नंगी समशेर घेऊन आले व त्यांनीं असें जाहीर केलें कीं मला जो नवीन धर्म स्थापन करावयाचा आहे त्याकरितां एक बळी देणें जरूर आहे. तेव्हां माझ्या शिष्यवर्गापैकीं आपल्या प्राणाची आहुति देण्यास जो सिद्ध असेल त्यानें पुढें यावें. आव्हान ऐकून जमलेली मंडळी विस्मित झाली. पुष्कळांना गुरूंना बुद्धिभ्रंश झाला असावा, अशी शंका आली. बराच वेळपर्यंत सभेंत शांतता राहिली व कोणी उठेना. परंतु अखेरीस दयाराम नांवाचा एक शिष्य पुढें होऊन त्यानें गुरूंच्या कार्याकरतां आपल्या प्राणाची आहुति देण्याची आपली तयारी दर्शविली. त्याबरोबर गुरूंना अत्यंत हर्ष होऊन त्यांनीं त्याचें अभिनंदन केलें व ते दयाराम ह्याला शेजारीं एक तंबू होता तेथें घेऊन गेले. लगेच तेथून तरवारीचा एक घाव ऐकूं आला. लवकरच रक्तानें माखलेली तरवार घेऊन गुरु बाहेर आले व त्यांनीं पुनः पूर्ववत् 'प्राणाची आहुति देण्यास दुसरा कोणी तयार आहे काय ?' अस विचारलें. ह्या वेळींहि बराच वेळपर्यंत शांतता राहिली. पण शेवटीं दुसरा एक शिष्य उभा राहिला. त्याचेंहि अभिनंदन करून गुरु त्याला शेजारच्या तंबूत घेऊन गेले. पुनः पूर्ववत् तरवारीचा घाव ऐकूं आला व पुनः गुरु रक्ताभिषिक्त तरवार घेऊन बाहेर आले. पुनः त्यांनीं तिसरा बळी मागितला. ह्या वेळींहि तिसरा एक शिष्य पुढें आला. अशा प्रकारें पांच शिष्य बळी म्हणून गुरूंनीं तंबूमध्यें नेले. ह्या सर्व अद्‌भुत प्रकारानें जमलेली मंडळी आश्चर्यचकित होऊन पुढ काय होणार ह्याबद्दल विचार करीत होती. इतक्यांत गुरु पांचहि शिष्यांसह तंबूबाहेर आले! वास्तविक गुरूंनीं हा प्रयोग केवळ आपल्या शिष्यवर्गाची कसोटी पहाण्याकरतां केलेला होता व तरवारीला जें रक्त लागलेलें होतें तें माणसाचें नसून बकऱ्याचें होतें !

पांच शिष्यांसह तंबूतून बाहेर आल्यानंतर गुरूंनीं धर्माकरतां प्राणाची आहुति देण्यास तयार होणारे पांच शिष्य आपल्या शिष्यवर्गांतून निघाल्याबद्दल जमलेल्या मंडळीचें अभिनंदन केलें व असे प्राणाहुति देणारे शिष्य ज्यामध्यें आहेत तो शिष्यवर्ग नवीन धर्माची दीक्षा घेण्यास सर्वस्वीं योग्य आहे व 'मला आतां त्या नवीन धर्माच्या भवितव्यतेबद्दल पूर्ण विश्वास वाटतो' असें त्यांनीं सांगितलें. त्यानंतर जे पांच शिष्य प्राणाहुति देण्यास तयार झाले होते, त्यांना त्यांनीं 'पंच प्यारे' असें नांव देऊन प्रथम नव्या धर्माची दीक्षा दिली. गुरु गोविंदसिंग यांनीं आपल्या नव्या धर्माला 'खालसा' म्हणजे 'शुद्ध' असें नांव दिलें. ह्यापूर्वी शीखधर्माची दीक्षा 'गुरुचरणामृत' (म्हणजे गुरूंनीं पायाचा अंगठा बुडविलेलें पाणी) देऊन करीत असत. ह्याला 'चरण पहुल' असें म्हणत. त्याऐवजीं गुरु गोविंदसिंगांनीं लोखंडाच्या भांड्यांत पाणी घेऊन त्यांत खडीसाखर मिसळली; ती तरवारीनें ढवळून तें पाणी त्या पांच शिष्यांवर शिंपडलें व त्यांना तें थोडेसें प्राशन करण्यास दिलें. ह्या नवीन दीक्षेला 'अमृत पहुल' असें नांव त्यांनीं दिलें. पाण्यामध्यें खडीसाखर मिश्रित करण्यामध्यें सर्व शिष्यांमध्यें प्रेमभाव रहावा, व तरवारीनें तें ढवळण्यामध्यें त्यांच्यामध्यें क्षात्रभाव उत्पन्न व्हावा







अशी दुहेरी व्यंजना ह्या दीक्षेमध्यें होती. ही दीक्षा देतांना गुरूंनीं गुरु नानकांनीं केलें तें 'जपजी' स्तोत्र व स्वतः केलेलें 'जापजी' स्तोत्र, व ग्रंथसाहेबांतील इतर कांहीं भागांचा उच्चार केला. दीक्षा दिल्यानतर 'वा हे गुरुजीकी खालसा[1]' 'वा हे गुरुजीकी फत्ते' अशा तऱ्हेची गुरूंनीं घोषणा केली व जमलेल्या मंडळींनीं त्याची उच्च स्वरानें द्विरुक्ति केली.

**पांच 'कक्के'**

वरीलप्रमाणें 'पंच प्याऱ्यां' ना दीक्षा दिल्यानंतर गुरु गोविंद ह्यांनीं त्यांना आपणांस दीक्षा देण्याची विनंति केली. ती ऐकून सर्वांना आश्चर्य वाटलें. परंतु त्या विनंतीच्या स्पष्टीकरणार्थ गुरूंनीं असें सांगितलें कीं, "ह्यापुढें 'खालसा' म्हणजेच 'गुरु' समजावा व जेथें 'खालसा' धर्माचे पांच शीख आहेत तेथें 'खालसा' आहे असें मानावें. ह्यापुढें माझ्यांत व तुमच्यांत भेद नाहीं." त्यानंतर 'पंच प्याऱ्यां'नीं गुरूंच्या इच्छेप्रमाणें त्यांना दीक्षा दिली. दीक्षा देतेवेळीं गुरूंनीं प्रत्येक शीखानें 'सिंग (=सिंह) हें पद आपल्या नांवापुढें लावावें व पांच 'कक्के' म्हणजे 'क' या अक्षरानें सुरूं होणाऱ्या पांच गोष्टी धारण कराव्या असा निर्बंध सांगितला. ह्या पांच गोष्टी म्हणजे केश (न कापलेले डोक्यावरील केंस व दाढी), कंगी(फणी), कृपाण (तलवार किंवा कट्यार), कडा (लोखंडाचे कडें) व कच्छ (गुडघ्यापर्यंतची चड्डी). ह्या दोन निर्बंधांप्रमाणें गुरूंनीं स्वतः गोविंदसिंग असें नांव धारण केलें व इतर वस्तू परिधान केल्या. ह्या वस्तु व नांव क्षात्रधर्माला अनुरूप व पोषक अशा आहेत. केस न कापल्यामुळें शीखांचा चेहरा भव्य दिसतो; कंगी केस साफ ठेवण्यास नित्योपयोगी वस्तु आहे; तलवार ही अर्थात् युद्धास आवश्यक आहे; 'कच्छ' सुटसुटीत असल्यामुळें शिपायास पोशाखाच्या दृष्टीनें सोयीची असते. लोखंडाचें कडें पण आरोग्यास पोषक आहे अशी समजूत आहे. ह्या वस्तूंमुळें शीखांच्या बाह्य स्वरूपांत साम्य येऊन त्यांना आपल्या एकत्वाची साक्ष पटते व क्षात्रवृत्तीचीहि आठवण राहते. गुरु गोविंदसिंग म्हणत कीं 'खालसा-धर्मानें मी जंबूकांचे सिंह बनवीन.' शीख लोकांचा पुढील इतिहास त्यांच्या म्हणण्याची सत्यता पटवितो.

शीख लोकांची रहाणी व समाजव्यवस्था हिंदूंच्यापासून भिन्न रहावी ह्या हेतूनें गुरु गोविंदसिंग ह्यांनीं नित्य व्यवहारास उपयोगी असे साधे इतर बरेच निर्बंध घालून दिले. ते त्यांनीं लिहिलेल्या 'रहतनामा' नांवाच्या पत्रकांत नमूद केलेले आहेत. हे नियम 'खालसा' धर्मास अनुसरून व सामान्य नीतितत्त्वास पोषक असे आहेत. उदाहरणार्थ, "फक्त एका परमेश्वरासच भजा; सकाळीं नित्य लवकर उठून 'जपजी' व ग्रंथसाहेबांतील इतर स्तोत्रांचें पठण करा; मूर्ति, समाधि वगैरेची पूजा करूं नका; ग्रंथसाहेबाशिवाय इतर कोणतीहि–वेद, पुराण, कुराणादि धर्मपुस्तकें मानूं नका; जातिभेद मानूं नका; जननमरणविवाहादि गृह्य संस्काराकरतां ब्राह्मण वगैरे बोलावूं नका; अशा प्रसंगीं फक्त ग्रंथसाहेबांतील विशिष्ट पद्यांचा उपयोग करीत जा; परद्रव्य व परदारा ह्यांचा अभिलाष धरूं नका; दुःखितांस मदत व क्षुधितास अन्न द्या; तमाखू इत्यादि मादक पदार्थांचें सेवन करूं नका" वगैरे वगैरे. ह्या नियमांचें चुकून उल्लंघन झाल्यास त्याबद्दलचें प्रायश्चित्त पण रहतनाम्यांत सांगितलेलें आहे.

अशा प्रकारच्या 'खालसा' धर्माची स्थापना झाल्यावर गुरूंनीं सर्व शीखांना त्या धर्माची दीक्षा घेण्यास आव्हान केलें व त्याप्रमाणें पुष्कळांनीं दीक्षा घेतली. हिंदूंच्यापैकींहि पुष्कळ लोक – विशेषतः कनिष्ठ जातींतील–ह्या धर्मांत येऊं लागले. अशा तऱ्हेनें शीख धर्मांत आलेल्या लोकांस गोविंदसिंग फार प्रेमानें वागवीत व त्यांनाहि गुरूंच्याबद्दल अत्यंत आदर व प्रेम वाटे. भंगी, चांभार वगैरे हिंदु जातींतून आलेल्या लोकांस 'रंगरेटा' किंवा 'मझबी' असें म्हणत. गुरु गोविंदसिंग 'रंगरेटा, गुरु का बेटा' असें म्हणून त्यांस पुत्राप्रमाणें वागवीत. ह्या कनिष्ठ वर्गांतील लोकांमध्यें 'खालसा' धर्म स्वीकारल्यावर समतेची भावना व आत्मविश्वास उत्पन्न झाल्यामुळें त्यांच्यांत विलक्षण फरक दिसून येत असे. त्यांच्यामधून पुष्कळ शूर लढवय्ये निर्माण होऊन त्यांचा धर्मसंरक्षणाच्या कामीं पुढें फार उपयोग झाला. 'खालसा' धर्माच्या लोकांचा वेष, आचार, विचार ह्यांमध्यें साम्य असल्यामुळें त्यामध्यें एकराष्ट्रीयत्वाची जागृति झपाट्यानें होऊं लागली व त्याबरोबरच गुरु गोविंदसिंग ह्यांचें लष्करी

१ 'वाहेगुरु' हा शब्द शीख लोक 'परमेश्वर' ह्या अर्थानें उपयोगांत आणतात.







सामर्थ्यहि वाढूं लागलें.

### अनन्वित छळाला तोंड देणारें अचल धैर्य

'खालसा' धर्माची स्थापना होऊन गुरु गोविंदसिंगांचें वजन व सामर्थ्य वाढत चाललेलें पाहून शेजारील कांगडा प्रांतांतील राजांना आतां अधिकच भीति वाटूं लागली. गुरु गोविंदसिंग ह्यांनीं त्यांना मुसलमानी जुलमाच्या प्रतिकारार्थ सर्वांनीं एक होण्याची आवश्यकता पटवून देण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. पण तो व्यर्थ गेला. शेवटीं त्या राजांनीं "गुरु गोविंदसिंग हिंदु व मुसलमान ह्या दोन्ही धर्मांवर घाला घालीत असून तो मोंगल राज्याच्या विरुद्ध लढण्याची तयारी करीत आहे" अशा अर्थाची औरंगजेबबादशाहाकडे तक्रार केली. बादशहा त्यावेळेस म्हणजे इ. स. १७०२ च्या सुमारास दक्षिण हिंदुस्थानांत मराठ्यांशी लढण्यांत गुंतला असल्यामुळें तो स्वतः येऊं शकला नाहीं. पण त्यानें लाहोर व सरहिंद येथील सुभेदारांना गोविंदसिंगांच्या विरुद्ध 'जिहाद' म्हणजे धर्मयुद्ध पुकारण्यास हुकूम दिला.

बादशहांच्या हुकुमाप्रमाणें लाहोरचे सुभेदार जबरदस्तखान व सरहिंदचे सुभेदार वझीरखान हे आपआपलीं सैन्यें घेऊन निघाले व दोघांचीं सैन्यें अंबाला जिल्ह्यांतील रोपड मुक्कामीं एकत्र झालीं. तेथेंच कांगडा प्रांतांतील कांहीं हिंदु राजेहि त्यांना आपल्या सैन्यांसह येऊन मिळाले. तेथून हें प्रचंड सैन्य आनंदपूरकडे रवाना झालें व त्यानें आनंदपूरला वेढा दिला. गुरु गोविंदसिंगांनीं आनंदपूरला एक किल्ला बांधलेला होता. तेथें त्यांनीं पुष्कळ दिवस आपला बचाव केला. परंतु पुढें टिकाव लागेल असें दिसेना. तेव्हां त्यांना गुप्तपणें आपल्या कुटुंबासह तेथून जाणें भाग पडलें. गोविंदसिंग हे अजितसिंग व जोरावरसिंग नांवाच्या आपल्या दोन पुत्रांसह रोपडजवळ, चमकौर मुक्कामीं त्यांचा दुसरा किल्ला होता, तेथें आश्रयास गेले. त्यांची माता गुजरीदेवी ही त्यांच्या दुसऱ्या दोन फत्तेसिंग व जज्जरसिंग नांवाच्या लहान मुलांसह सरहिंदजवळ खेडी मुक्कामीं एका सेवकाच्या घरीं आश्रयास गेली. त्यांच्या पत्नी दिल्लीस गेल्या. पण गोविंदसिंग चमकौर येथें गेल्याची बातमी शत्रूस पोहोंचून पुनः तेथें त्यांना वेढा पडला. तेथें झालेल्या युद्धामध्यें त्यांचे दोन्ही पुत्र म्हणजे अजितसिंग व जोरावरसिंग हे पराक्रमानें लढून धारातीर्थी पडले. शेवटीं गोविंदसिंगांना वेष पालटून गुप्तपणें पुनः निसटून जाणें भाग पडलें. त्यानंतर गोविंदसिंगांना बरेच दिवस हालअपेष्टा सोसून निरनिराळ्या ठिकाणीं गुप्तपणें काळ घालवावा लागला. अशा तऱ्हेनें फिरत असतांनाच त्यांना आपल्या दुसऱ्या दोन मुलांच्या भयंकर मृत्यूची वार्ता कळली. हीं दोन मुलें सरहिंदजवळ खेडी मुक्कामीं गेलीं होतीं हें वर सांगितलेंच आहे. त्यांच्याबद्दल सरहिंदच्या सुभेदारास बातमी लागून त्यांनीं त्यांना पकडलें. हीं मुलें फक्त ७ व ९ वर्षांचीं होतीं. सुभेदार वझीरखान ह्यांनीं त्यांना "मुसलमानी धर्म स्वीकारा किंवा मरणास तयार व्हा" अशी आज्ञा केली. त्यावर त्या मुलांनीं "आम्ही गुरु तेग बहादरांचे नातू व गुरु गोविंदसिंगांचे पुत्र आहोंत; आम्ही आपला धर्म कधींहि सोडणार नाहीं" असें बाणेदार उत्तर दिलें. तेव्हां वझीरखानानें त्यांना मारण्याचा हुकूम दिला. जवळच्या लोकांनीं त्या मुलांच्या वयाकड लक्ष देऊन त्यांस जीवदान देण्याची विनंति केली. परंतु त्या अधम वझीरखानास द्रव न येऊन त्यानें शेवटीं त्या अर्भकांना भिंतीमध्यें चिणून मारविलें! त्यानंतर माता गुजरीनें पण माडीवरून उडी टाकून प्राणत्याग केला. ह्या अमानुष कृत्यामुळें सरहिंद हें गांव शीख लोक फार अपवित्र समजतात व त्यांच्यामध्यें ह्या गांवाला 'गुरुमार' अशी संज्ञा पडली आहे.

वरीलप्रमाणें अनर्थपरंपरा कोसळत असतांना देखील गुरु गोविंदसिंग ह्यांनीं आपला धीर खचूं दिला नाहीं. फिरतां फिरतां दीना नांवाच्या गांवीं कांहीं कालपर्यंत गुरु गोविंदसिंग आपल्या अनुयायांच्या घरीं आश्रयास राहिले व तेथें पुनः सैनिकांची जमवाजमव करूं लागले. गुरु गोविंदसिंगांचें साहस व सामर्थ्य ह्याबद्दल त्यांच्या शिष्यामध्यें इतका विश्वास होता कीं तेथेंहि त्यांच्या साहाय्यार्थ शिष्य जमा होऊं लागले. अशा रीतीनें त्यांच्या साहाय्याकरतां येणाऱ्या त्यांच्या शिष्यांच्या ४० जणांच्या एका तुकडीला मोंगल फौजेशीं फिरोजपूर जिल्ह्यांत खिदराना नांवाच्या गांवाजवळ सामना करावा लागला व ह्या सर्व लोकांनीं मोठ्या निकरानें लढून धारातीर्थी देह ठेवला. ह्या जागीं गुरु गोविंदसिंग ह्यांनीं एक तळें खोदण्याची आज्ञा केली व त्याला 'मुक्तिसर' असें नांव दिलें. ह्या ठिकाणीं पुढें एक गुरुद्वारा बांधलें







असून हें स्थान शीख लोक फार पवित्र समजतात.

पुढें कांहीं कालपर्यंत गोविंदसिंग दमदमा म्हणून पंजाबच्या दक्षिणभागीं असलेल्या एका गांवीं राहिले. तेथें असतांना त्यांनीं आपला ' दसवी पादशाही ' हा ग्रंथ लिहिला. ह्यामध्यें ' विचित्र नाटक ' म्हणून गोविंदसिंगांच्या आत्मचरित्राविषयींचा एक भाग असून शिवाय, गोविंदसिंगांचीं काव्यें, पद्यें वगैरेहि आहेत. येथें असतांना त्यांनीं ग्रंथसाहेबांची आणखी एक प्रत तयार करवली. गुरु गोविंदसिंग ह्यांनीं बराच काळ येथें घालवून ग्रंथरचना वगैरे केली असल्यामुळें ' दमदमा ' हें स्थान शीख लोक पवित्र समजतात. पुष्कळ विद्वान् व धार्मिक शीख लोक येथें अजूनहि रहातात.

गुरु गोविंदसिंग ह्यांचा पराभव झाल्यानंतर ते दीना मुक्कामीं असतांना बादशहा औरंगजेब ह्यानें त्यांना बोलावण पाठविलें होतें. पण त्यांनीं स्वतः न जातां बादशहाला ' झफरनामा ' ( म्हणजे ' विजयपत्रिका ' ) म्हणून फारसी भाषेमध्यें एक पत्र पाठविलें. ह्या पत्रामध्यें त्यांनीं औरंगजेबबादशहाची त्याच्या विश्वासघातकी व क्रूर बर्तनाबद्दल व त्यानें परधर्मीयांच्या केलेल्या छळाबद्दल चांगली कानउघडणी केली व परमेश्वर हा एकच असून ह्या सर्व कृत्याबद्दल त्याला परमेश्वरापुढें जाब द्यावा लागेल असें बजावलें. ह्या पत्राचा वृद्ध बादशहाच्या मनावर बराच परिणाम झाला असें म्हणतात. औरंगजेब पुढें लवकरच मरण पावला.

## दक्षिणेकडे प्रयाण

औरंगजेबाच्या मृत्यूनंतर त्याच्या मुलांच्यामध्यें नेहमींप्रमाणें तंटा उत्पन्न होऊन युद्ध सुरू झालें. ह्यामध्यें गुरु गोविंदसिंगांनीं आपले सैनिक बहादुरशहाच्या विनंतीवरून त्याच्या मदतीस पाठवले व शेवटीं त्यांस जय मिळून तो गादीवर बसला. पुढें गुरु गोविंदसिंग हे दक्षिणेकडे गेले. ह्या प्रवासाचा हेतु दक्षिणेकडे फक्त आपल्या ' खालसा ' धर्माचा प्रसार करण्याचा होता किंवा तिकडे बळावत चाललेल्या मराठ्यांच्या राज्याशीं मैत्री जोडण्याचा राजकीय हेतु पण त्यांत होता हें समजण्यास साधनें उपलब्ध नाहींत. कारण पुढें लवकरच म्हणजे इ. स. १७०८ मध्यें हैद्राबाद प्रांतांत नांदेडमुक्कामीं गुरु गोविंदसिंग ह्यांचा त्यांच्या एका पठाण नोकरान ते निजले असतांना खून केला. ह्या खुनासंबंधानें निरनिराळ्या हकीकती प्रसिद्ध आहेत. पण सामान्यतः अशी समजूत आहे कीं ह्या पठाणाच्या आजाला गुरु गोविंदसिंगांनीं लढाईंत मारलें होतें, त्याचा सूड घेण्याकरतां त्यानें हें कृत्य केलें.

गुरु गोविंदसिंग ह्यांनीं आपल्यामागें कोणी गुरु नेमला नाहीं. त्यांनीं शिष्यवर्गास असें सांगितलें कीं " मी सर्व खालसा ' अकाल ' परमेश्वराच्या स्वाधीन करीत आहे व तुम्हीं ग्रंथसाहेबांत असलेली गुरूंची वाणी हीच ह्यापुढें गुरु समजावी. " नांदेडमुक्कामीं जेथें गुरु गोविंदसिंग ह्यांचा वध झाला तेथें गुरु गोविंदसिंग ह्यांच्या स्मरणार्थ पुढें महाराणा रणजितसिंह ह्यांनीं एक मोठें गुरुद्वारा बांधलेलें आहे. नांदेड ह्या गांवाला शीख लोक ' अविचल नगर ' असें म्हणतात व पुष्कळ भाविक शीख तेथें यात्रेला जातात.

## शीख धर्माला आलेलें क्षात्रस्वरूप

हिंदुस्थानच्या इतिहासांतील महापुरुषांमध्यें गुरु गोविंदसिंग ह्यांना उच्च स्थान मिळेल ह्यांत शंका नाहीं. गुरु गोविंदसिंग हे केवळ शीख लोकांचे एक गुरु नसून ते धर्मसंस्थापक, समाजव्यवस्थापक, मुत्सद्दी, योद्धे, कवि व ग्रंथकार होते. अशा तऱ्हेचा गुणसमुदाय एका पुरुषामध्यें सांपडणें कठिणच. गुरु गोविंदसिंग शीखांच्या गुरुपदावर चढले तेव्हां फक्त नऊ वर्षांचेच होते. परंतु तेव्हांपासून मुसलमानी जुलमाचा प्रतिकार करून शीख धर्माचा नववृक्ष सुरक्षित राहील अशा करतां काय तजवीज करावी ह्याबद्दल त्यांच्या मनांत विचार घोळत होते. गुरु नानक ह्यांचा पंथ शांततावादी होता. पण अशा रीतीनें शांततामार्गानें धर्मरक्षण होणें कठीण हें ओळखून गुरु गोविंदसिंग ह्यांनीं शीखधर्माला क्षात्रस्वरूप देण्याचा निश्चय केला. गरीब लोकांवर होत असलेला जुलूम व धर्मप्रीत्यर्थ होत असलेला छळ पाहून, ह्या जुलमाचें निर्मूलन करणें व धर्माचा पाया मजबूत करणें हें आपलें जीवितकार्य आहे ही भावना त्यांच्यामध्यें दृढ झाली. ' विचित्र नाटक ' ग्रंथांत ते म्हणतातः

' हम इस काम जगत में आये ।
धरम हेत गुरुदेव पढाये ॥
जहा तव्हां तुम धर्म पछाडो ।
दुष्ट रोपिआं पकड पछाडो । '








# गुरु गोविंदसिंग

[ तात्पर्यः ' आम्ही धर्मप्रसार व दुष्टांचें शासन करणें ह्या कार्याकरतांच ह्या जगतांमध्यें आलों ' ]

गुरु गोविंदसिंग ह्यांनीं निराळीं धर्मतत्त्वें अशीं प्रतिपादन केलीं नाहींत. गुरु नानक ह्यांनीं जीं धर्म-तत्त्वें सांगितलीं होतीं त्यांचेंच ते जोरानें प्रतिपादन करीत. परंतु गुरु गोविंदसिंगांच्या वेळेपर्यंत शीखधर्माला नुसतें विशिष्ट धर्मतत्त्वांचेंच स्वरूप होतें. धर्माला सामान्य लोकांच्या आचरणाकरतां विधिनिषेधात्मक सुगम नियम बांधून व्यवस्थित स्वरूप देणें जें जरूर असतें तशा तऱ्हेचा प्रयत्न तोंपर्यंत झालेला नव्हता. 'जातिभेद मानूं नये' अशी गुरु नानकांची शिकवणूक होती. पण व्यवहारांत तो शीखांच्यामध्येंहि मानला जाई. तसेंच ब्राह्मणांच्या उपनयन, क्रियाकर्मादि संस्कारांत अर्थ नाहीं असें गुरु नानक ह्यांचें प्रतिपादन होतें. तरी व्यवहारांत हे संस्कार पुष्कळ शीख पाळीत असत. तात्पर्य, हिंदु स्मृतिशास्त्रांतील समाजव्यवस्थेची रूढि सामान्य जनांमध्यें इतकी दृढ झालेली होती कीं शीख लोकांना स्वतंत्र समाजव्यवस्थेचे नियम घालून दिल्याशिवाय ही परिस्थिति बदलणें शक्य नाहीं अशी गोविंदसिंग ह्यांची खात्री झाली. तव्हां शीख लोकांमध्यें क्षात्रवृत्ति उत्पन्न व्हावी व त्यांची समाज-व्यवस्था गुरु नानक ह्यांच्या शिकवणुकीला धरून असावी अशा दुहेरी हेतूनें गोविंदसिंग ह्यांनीं आपला नवा ' खालसा ' धर्म स्थापन केला. गुरु गोविंदसिंगांनीं रहतनाम्यामध्यें शीखलोकांकरितां जे सामाजिक व नैतिक नियम घालून दिले ते साधे व गुरु नानक ह्यांनीं प्रतिपादन केलेल्या तत्त्वांस पोषक असे होते. आजकाल शीख लोकांचें ज्या गोष्टीमुळें व्यवहारांत वैशिष्ट्य दिसून येतें त्या सर्व गोष्टी म्हणजे ' क ' नें सुरू होणाऱ्या पांच पदार्थांचें धारण, सिंग पद अंतीं असणारें नांव वगैरे गोष्टी गुरु गोविंदसिंगांच्या वेळेपासूनच प्रचारांत आल्या.

गुरूंच्यावर त्या काळीं शिष्यांची निःसीम भक्ति असे. त्यांच्याकरतां प्राण देण्याकरतां पांच शिष्य कसे पुढें आले हें पूर्वी सांगितलेंच आहे. गुरु गोविंदसिंग हे आपल्या शिष्यास म्हणत :

पहिलां मरना कबूल कर । जीवनकी छोडि आस ॥
होहु सभों की रेणुका । तव आन हमारे पास ॥

[ अर्थः ' प्रथम जीविताची आशा सोडून मरणाची तयारी कर. सगळ्यांचे पायाची धूळ म्हणून आपणास समज व मग माझा शिष्य बन '. ]

गोविंदसिंग हे स्वतः फार शूर व साहसी असल्यामुळें त्यांच्या सैनिकांना त्यांच्याबद्दल अत्यंत आदर व विश्वास वाटे. त्यांनीं तरुणपणीं एकदां फक्त समशेर हातांत घेऊन एकट्यानें वाघाची शिकार करून त्यांस चीत केलें होतें अशी आख्यायिका आहे. तसच धनुर्विद्येंत ते इतके पटाईत होते कीं शत्रूकडील गोलंदाजांना ते अचूक बाण मारून जखमी करीत व अशा रीतीनें त्यांच्या तोफा निकामी करीत. गोविंदसिंगांच्या पराक्रमा-नें त्यांच्या सैनिकांना स्फुरण चढून ते जीवावर उदार होऊन लढत. गोविंदसिंग म्हणत असत :

चिडियां कोलों बाझ तुरा । सवा लाखसे एक लढा ।
तभी गोविंदगोसिंग कहा ।

[ अर्थः ' मी चिमण्यांना ससाण्याशीं झुंज करून त्याला पळवावयास लावीन; एकट्याला सवालाखाशीं लढवीन तरच मी नांवाचा गोविंदसिंग ! ' ]

आनंदगड व चमकोर येथील लढ्यांत गोविंदसिंग व त्यांच्या सैनिकांनीं जें शौर्य दाखविलें तें वरील उक्तीस साजेसेंच होतें. त्यामुळें त्यांनीं शत्रूला थक्क करून सोडलें.

गोविंदसिंगांचें खालसावर निःसीम प्रेम असें. त्यांचे चार पुत्र नाहींसे झाल्यावर त्यांच्या पत्नी शोक करूं लागल्या तेव्हां ते म्हणाले :

इन पुत्रां के सीस पर । प्यार दिये सुट चार ।
चार गये तो क्या हुआ । जीवत है हजार ।

[ अर्थ : ' ह्या माझ्या पुत्रांकरतां ( शिष्यांकरतां ) मी चार (पुत्र) बळी दिले. चार गेले तरी काय परवा ? हे दुसरे हजारों (पुत्र–म्हणजे शिष्य) जिवंत आहेत ! ]

गुरु गोविंदसिंग ह्यांचा पराभव होऊन त्यांचा नाश झाला असें त्यांचे शत्रू समजत तोंच ते दुसरे ठिकाणीं जाऊन पुनः सैन्य जमवीत. अशा रीतीनें औरंगजेब बादशहाचें अफाट सैन्य असतांनाहि त्यांचा पुरा मोड होऊं शकला नाहीं. इतकेंच नव्हें तर औरंगजेब बादशहाच्या मरणानंतर त्याचा पुत्र बहादुरशहा ह्याला-हि पण त्याच्या विनंतीवरून गोविंदसिंग ह्यांनीं थोडी कुमक देऊन त्याचा स्नेह संपादन केला.

## वीर, कवि व ग्रंथकार

युद्धकला व कविप्रतिभा हे दोन गुण एकाच व्यक्तीमध्यें











क्वचितच दिसून येतात. पण गुरु गोविंदसिंग हे शूर वीर असून शिवाय कवि व ग्रंथकारहि होते. त्यांनीं केलेलीं काव्यें व त्यांचे लेख त्यांच्या नांवानें प्रसिद्ध असलेल्या ' दसवी बादशाहीका ग्रंथ ' ह्यांत ग्रथित केलेले आहेत. त्यांची स्मरणशक्ति फार तीव्र असे, असें म्हणतात. गुरु अर्जुनसिंग (सन १५६३–१६०६) ह्यांच्यावेळीं लिहिलेली ' ग्रंथसाहेबाची ' अस्सल प्रत त्यांच्या एका नातलगाकडे होती. गुरु गोविंदसिंग ह्यांचा चमकौर येथें पराभव होऊन ते दमदमा येथें रहात असतांना त्यांनीं ती प्रत मागविली पण ती त्यांच्या नातलगांनीं देण्याचें नाकारलें. तेव्हां गोविंद-सिंगांनीं तो समग्र ग्रंथ भाई मणिसिंग ह्यांना स्वतः बिनचूक सांगून लिहून काढविला. गुरु तेग बहादर ह्यांनीं केलेलीं पद्यें व स्वतः केलेला एक श्लोकहि त्यांनीं त्यांत ग्रथित केला. ' विचित्र नाटक ' व इतर पद्यें व लेख हे मात्र पुढे ' दसवी बादशाहीका ग्रंथ ' ह्या ग्रंथांत समाविष्ट केले गेले. औरंगजेबबादशहाला त्यांनीं ' झफरनामा ' म्हणून एक पत्र पाठवल्याचें पूर्वी सांगि-तलेंच आहे. हें पत्र पर्शियन भाषेंत मोठ्या भारदस्त शब्दांमध्यें लिहिलें असून त्यांतील विचार गंभीर आहेत.

## गुरुपद काढून टाकण्यांतलें दूरदर्शित्व

गुरु गोविंदसिंग ह्यांनीं खालसा धर्म स्थापन केला तरी ते स्वतःस ईश्वराचा अवतार म्हणवून घेत नसत. ' विचित्र नाटक ' ग्रंथांत ते एके ठिकाणीं म्हणतात : " मी फक्त परमेश्वराचा सेवक आहे. मलाच परमेश्वर समजतील ते खचित नरकांत जातील. " गुरु गोविंद-सिंग ह्यांनीं ' खालसा ' स्थापन केल्यावरहि ते स्वतः साध्या वृत्तीनें रहात असत. पूर्वी 'मसंद' नांवाचे गुरूंचे सेवक त्यांच्याकरतां शिष्यवर्गाकडून दक्षिणा आणीत असत. परंतु ' मसंद ' आपल्या अधिकाराचा दुरुपयोग करून शिष्यवर्गास लुबाडीत असत ही गोष्ट नजरेस आल्यावर गुरु गोविंदसिंग ह्यांनीं ही पद्धतीच काढून टाकून मसंदवर्ग नाहींसा केला. गुरु गोविंदसिंग ह्यांची राहणी साधी असल्यामुळें ते मूल्यवान् वस्तूंचा स्वतःकरितां स्वीकार करीत नसत. एकदां एका शिष्यानें त्यांच्याकरितां रत्नजडित कंकणांची जोडी आणली होती. त्यावेळीं गोविंदसिंग सतलज नदीच्या तीरावर बसले होते. कांहीं वेळ निरखून गुरूंनीं एक कंकण सहज नदीमध्यें फेंकलें ! त्याबरोबर भोंवतालची मंडळी चकित झाली. गुरूंच्या हातून तें कंकण कदाचित् चुकून निसटून गेलें असेल असें समजून एकानें विचारलें कीं 'कंकण कोठें पडलें आहे ती जागा मला दाखवली तर बुडी मारून मी तें काढतों. ' त्या-बरोबर गुरूंनीं दुसरें कंकण पण नदींत फेंकलें व ते म्हणाले "पहिलें कंकण फेंकलें तेथेंच दुसरें पण गेलें आहे."

आपल्यामागें गुरुपदावर कोणासहि न नेमतां ' ग्रंथसाहेब ' हाच सर्व शीखांनीं गुरु समजावा अशी व्यवस्था करण्यामध्यें गुरु गोविंदसिंगांचा दूरदर्शीपणा दिसून येतो. आपल्यामागें गुरु म्हणून नेमण्यास योग्य असे त्यांचे बंदा किंवा गुरुबक्षसिंग ह्या नांवाचे प्रियशिष्य होते. परंतु त्यांच्यावर त्यांनीं मुसलमानांच्या जुलमाचा प्रतिकार करण्याचें कार्यच फक्त सोंपवलें. गुरु नानक ह्यांच्यामागे जे नऊ गुरू झाले त्यांनीं त्यांच्या धर्मतत्त्वांना व्यवस्थित स्वरूप देऊन त्यांचा पुष्कळ प्रसार केलेलाच होता. तीं धर्मतत्त्वें आतां ' गुरु ग्रंथसाहेब ' ह्या ग्रंथामध्यें गुरु नानक व त्यांच्यामागून झालेल्या गुरूंनीं सामान्य जनांना समजणाऱ्या पंजाबी भाषेंत केलेल्या पद्यांमध्यें ग्रथित केलेलीं उपलब्ध होतीं. त्यामुळें ह्या गुरुपरंपरेचें मुख्य कार्य संपलें होतें. गुरुपरंपरेमुळें गुरुपदासंबंधीं भांडणें उत्पन्न होत व त्यामुळें आणखी पंथ उत्पन्न होत असाहि अनुभव आला होता. गुरु नानक ह्यांचे पुत्र श्रीचंद ह्यानीं ' उदासी ' पंथ काढला व त्यांच्या वंशांतील धीरमल, रामराय ह्यांनींहि स्वतंत्र पंथ काढले होते. अशामुळें शीखांच्यामध्यें फूट होण्याचा संभव होता. शिवाय गुरुपद हें कांहीं दृष्टींनीं ' खालसा ' धर्माच्या समत्वाच्या तत्त्वाशीं विसंगतच होतें. तेव्हां सर्व दृष्टींनीं विचार करून गुरु गोविंदसिंग ह्यांनीं गुरुपद काढून टाकून ' गुरु ग्रंथसाहेबा'ला तें स्थान अर्पण केलें तें योग्यच झालें. गुरुपद काढून टाकल्यामुळें ' खालसा ' धर्माचा जोम बिलकूल कमी झाला नाहीं. इतकेंच नव्हें तर गुरु गोविंदसिंगांच्या मागून शीख लोकांचा अमानुष छळ झाला तरी त्या भयंकर दिव्यांतून बचावून पुढें शीख लोकांचें पंजाबांत स्वतंत्र राज्य स्थापन झालें.



अनुक्रमणिका






प्रा. देवदत्त अ. दाभोलकर

# वीर बन्दा : रवीन्द्रनाथ व सावरकर यांचा काव्यविषय

**वीर बन्दा** याचें जीवन व मरण हें शीखलोकांच्या इतिहासांतील एक रोमहर्षक पान आहे. या वीरमरणानें अनेक कवींना स्फूर्ति दिलेली आहे. रवीन्द्रनाथ ठाकूर व स्वातंत्र्यवीर सावरकर या दोघांनींहि वीर बन्दा याचें आपल्या कवितांतून पूजन केलें आहे. रवीन्द्रनाथ कवि म्हणून जगद्विख्यात, तर सावरकर यांची कवि म्हणून केवळ महाराष्ट्रालाच ओळख. परंतु सावरकरांच्या प्रतिभेचा पल्लाहि महाकवीचाच याविषयीं मराठी रसज्ञांना तरी कधींच संदेह नव्हता. वीररस हा तर सावरकरांचा आवडता विषय व जीवनधर्म. रवीन्द्रनाथांची प्रतिभाहि वीररसाचें वर्णन करतांना एखाद्या जातिवन्त शाहीराच्या तन्मयतेनें रंगून जाणारी. हा एकच काव्यविषय या दोन कविश्रेष्ठांनीं कसा रंगविला आहे हें पाहणें यामुळेंच मनोरंजक व उद्बोधक व्हावें.

या दोन कवितांच्या रचनाकालांतहि तसें विशेष असें अंतर नाहीं. **रवीन्द्रनाथांची ' बन्दी वीर '** ही कविता आधींची. ती १८९९ मध्यें लिहिली गेली. रवीन्द्रनाथांचें वय त्या वेळीं ३८ वर्षांचें होतें. सावरकरांची कविता ही त्यानंतर सुमारें दहा वर्षांनीं १९१० मध्यें रचलेली. सावरकरांचें या वेळचें वय २७ वर्षांचें. ज्या पार्श्वभूमीवर सावरकरांनीं ही कविता रचिली ती पार्श्वभूमि मात्र वीररसाच्या उत्कट परिपोषाला विशेष अनुकूल अशी होती. **श्री ' बन्दा वीर ' ही सावरकरांची** कविता ' मूर्ति दुजी ती ' या कवितेचा एक भाग म्हणून लिहिण्यांत आलेली आहे. या कवितेची पार्श्वभूमि ' रानफुलें ' या कवितासंग्रहांत पुढीलप्रमाणें सांगण्यांत आलेली आहे :

"सन १९१० मध्यें बॅ. सावरकर फ्रान्समधून परत येतांच इग्लंडमध्यें धरले गेले. लंडनच्या पोलीस-चौकींत ते प्रथम बंदी असतां इंग्लंडच्या मानानेहि अतिशय कडक अशी थंडी पडूं लागली. त्यांतहि त्या कोठडीच्या भिंतीहि दगडी! फरशी दगडी! त्या गारांसारख्या गार व्हाव्यात. जवळ अंथरूण तर काय, पण पुरेसें पांघरूणहि नाहीं! दिवसरात्र पाय आपटावे, हात चोळावे, त्या पंधरावीस पावलांच्या लांबींतच भरभर फेऱ्या घालाव्या, तेव्हां कुठें गारठून जाणारे रक्त कांहीं उष्णता पावूं शकावें! त्या भयंकर शारीरिक गारठ्याचा परिणाम मानसिक उत्साहहि गारठण्यावर होऊं पहात आहे! त्यांतहि त्यांच्यावरचे आरोप राज्य-क्रान्तीचे! फांशीच्या छायेंत आपण आज उभे आहोंत हें त्यांस कळून चुकलेलें! त्या छायेंत प्रत्यक्षपणें असें — त्यांचें हें पहिलेंच — पाऊल पडतांना उग्र भीषण कर्तव्यास तोंड देण्याचा जो असा प्रसंग त्यांच्यावर आला, तो निभावून नेण्यास धैर्यस्फूर्तीहि तितकीच उग्रभीषण हवी होती! त्या रात्रीं तशी स्फूर्ति देणाऱ्या ज्या भावना त्याच्या हृदयांत संचरत्या झाल्या त्याच त्यांनीं ह्या कवितेंत ग्रथिल्या आहेत. '

मरणाच्या छायेंत काव्य आणि जीवन यांना परस्परांपासून स्फूर्ति देऊं पाहणाऱ्या या कवितेसारख्या कविता जगाच्या वाङ्मयांत विरळच असतील!

**रवीन्द्रनाथांची बन्दी वीर '** व **सावरकरांची 'श्रीबन्दा वीर'** या दोन कवितांचीं आद्य स्फूर्ति-स्थानें अशीं वेगवेगळीं आहेत. 'बन्दी वीर' हें एका कविवर शाहीराचें वीरपूजन आहे " श्रीबन्दा वीर " हें एका वीरवर कवीची धृतिसाधना आहे. रवीन्द्रनाथांच्या सर्वच कवितांतून रचनेची सिद्धहस्त सफाई आहे. उलट, सावरकरांच्या कवितांच्या बाह्य रचनेइतकी क्लिष्ट आणि ओबडधोबड रचना शोधूनहि इतरत्र कुठें मिळणें कठीण होईल. परंतु सफाईचा गुळगुळीत हात फिरला नसतांनाहि, रचनेच्या प्रमाणांना न जुमानतां, एखाद्या प्रचंड शिळेंतून ओबडधोबड परंतु जिवंत शिल्प खोदलें जावें तशी सावरकरांची कविता चैतन्यानें रसरसलेली असते. हा रचनाकौशलांतील भेद ' बन्दी वीर ' व 'श्रीबन्दा वीर' या कवितांतूनहि स्पष्टपणें आढळून येतो.








रवीन्द्रनाथांची सारी रचना रेखीव व प्रमाणबद्ध आहे. आपल्याला कोणता परिणाम साधावयाचा आहे याची रवीन्द्रांना जाणीव आहे, तो कसा साधावा याचें तंत्र त्यांना माहीत आहे व तें तंत्र कुशलतेनें हाताळण्याची कारागिरी त्यांच्या कलेंत आहे. या उलट 'श्रीबन्दा वीर' हा एक अनिरुद्ध खळाळणारा प्रवाह आहे. या प्रवाहाला द्वेषाची धार आहे, तिखट नाकाला येणारा जातीयतेचा दर्प आहे. परंतु त्याबरोबरच त्यांत जिवंत जोमहि पण आहे हें निश्चित.

जुलमी मोंगल राजसत्तेच्या अनन्वित छळापुढें शरण न जातां ज्या वीरवृत्तीनें बन्दा यानें आपलें मरण स्वीकारलें ती वीरवृत्तीच या दोघांचाहि काव्यविषय आहे. परंतु या छळाचें जितकें क्रूर व शहारे आणणारें वर्णन सावरकरांच्या कवितेंत आहे तितकें रवीन्द्रनाथांच्या कवितेंत नाहीं. सावरकरांचें सारें लक्ष वीर बन्दा याच्यावरच केन्द्रित झालेलें आहे. त्यानें सोसलेल्या छळाचें सविस्तर वर्णन त्यांनीं केलें आहे. ज्या कारणासाठीं ही कविता सावरकरांनीं रचिली ती लक्षांत घेतां, या भागालाच आपल्या कवितेंत सावरकरांनीं विशेष महत्त्व द्यावें हें साहजिकच होय. त्यांना स्वतःच्या तितिक्षेसाठीं त्या वीरस्मृतीच कवच घालावयाचें होतें. याच छळाचें रवीन्द्रनाथांनीं केलेलें वर्णन कितीतरी अधिक संयत आहे! बादशाहाच्या आज्ञेप्रमाणें आपल्या हातांनीं आपल्या बालकाचा वध केल्यानंतर ज्या धीरवृत्तीनें वीर बन्दा यानें आपलें मरण स्वीकारलें त्याचें संयत, उत्कट चित्रण त्यांनीं अवघ्या एका शेवटच्या कवितेंत केलें आहे.

' सभा हल निस्तब्ध
बन्दार देह छिंडिल घातक
सँडाशि करिया दग्ध
स्थिर हये वीर मरिल, ना करि
एकहि कातर शब्द
दर्शकजन मूदिल नयन
सभा हल निःशब्द '

तापलेले सांडस शरीरांत घुसले. परंतु त्या वीराच्या मुखांतून वेदनेचा एक उद्गार देखील बाहेर पडला नाहीं. सारी सभा स्तब्ध-निश्चल झाली. वाचकाच्या मनावरहि हाच परिणाम राहतो. कविता संपवितांना डोळे मिटून आपण एका बधिर वातावरणांत प्रवेश करीत आहोंत असें वाटतें. हा जागरूक कलेचा उत्कर्षबिन्दु कवीनें साधलेला आहे. —परंतु सावरकरांच्या सावेश प्रतिभेला ' दर्शकजन मूदिल नयन ' हें परिसमाप्तीचें स्थान म्हणून कधींच रुचलें नसतें. या हौतात्म्यांतून जी जनजागृति झाली तिचें वर्णन करणें व त्या हौतात्म्याच्या स्मरणानें आज जी जनजागृति करतां येणें शक्य आहे तिच्यासाठी प्रयत्नशील राहणें ही त्यांच्या प्रतिभेची प्रतिज्ञा आहे. म्हणूनच ते पुढें लिहितात:

' मृत झाला उज्जीवित । मृतचि मारिते ।
गाईनीं मारियले ठार कसाया ।
चिमण्यांनीं मारियले ठार ससाणे ।
पायदळींची रेती तापली अशी
कीं भाजुनि भस्म करी पायदळासी !
आणी ना कुतरेंही भीक दे अशी
होय बादशाहाची या दशा अहा—— '

वीर बन्दा याच्या छळाचें वर्णन करण्यांत ज्याप्रमाणें या कवींनीं वेगवेगळी पद्धति वापरली आहे त्याचप्रमाणें एकूण कवितेचा आटोप सांभाळण्याच्या त्यांच्या रीतीहि वेगळाल्या आहेत. सावरकरांच्या कवितेचें सर्वस्व वीर बन्दा आहे. रवीन्द्रनाथांच्या कवितेचा पहिला अर्धाअधिक भाग शीख लोकांचें पुनरुत्थान, मोंगल-शीख संग्राम व शीख ' बन्दी वीरां'ची मोंगलांनीं केलेली हत्या यांनीं व्यापिला आहे. रवीन्द्रनाथांनीं वापरलेलें वृत्तहि या गतिमान् घटनांचें वर्णन करावयास समर्थ असेंच आहे. कवितेच्या सुरवातीच्या पांच ओळींतच शीखांचें पुनरुत्थान होऊन शीख निर्भयपणें प्रतिकारासाठीं उभे राहिल्याचें चित्र आपल्या डोळ्यापुढें स्पष्टपणें उभें राहतें.

' पञ्चनदीर तीरे
वेणी पाकाईया शिरे
देखिते देखिते गुरुर मन्त्रे
जागिया उठेछे शिख
निर्मम निर्भीक '

कवितेच्या उत्तरार्धांत वीर बन्दा आपल्या नजरेसमोर येतो तो देखील तितकासा प्रामुख्यानें नव्हे. या उत्तरार्धांत देखील मुख्य चित्र आपल्या डोळ्यापुढें

उभें राहतें तें बन्दा याच्या अजाण परंतु शूर बालकाचें. किंबहुना या बालकाच्या चित्ररेखेच्या परावर्तित प्रकाशामुळें वीर बन्दा याच्याविषयीं आपल्याला अधिक सहानुभूति वाटूं लागते. त्या अजाण सानुल्याविषयीं सावरकरांनीं म्हटलें आहे :

> ' हळु न्यारे, हळु ! संभाळूनि, लेंकरूं
> हें लहान इतुकें कीं सांचल्या तया
> रक्ताच्या डबक्यांतचि सहज बुडुनियां
> जावें कीं जाता त्या वधशिलेकडे ! '

रवीन्द्रनाथांच्या कथेंत येथें फरक आढळतो. सावरकरांच्या कवितेंत मारेकरी त्या बालकाचा वध करतात. रवीन्द्रनाथांच्या कवितेंत वीर बन्दा यालाच आपल्या बालकाचा वध करावयाची आज्ञा होते. बन्दा ती पाळतो हीहि एक कठोर सहृदयताच होय. इतरांनीं हालहाल करून मारण्यापेक्षां आपल्या हातानें एका घावांत आपल्या चिमण्याचा अन्त केलेला बरा असेंच त्याच्या मनांत आलें असेल. या ठिकाणच्या कथाभागांत त्या बालकाचें एक अविस्मरणीय अमर चित्र रवीन्द्रनाथांनीं रेखाटलें आहे.—वधासाठी तो बालक बापाच्या मांडीवर जाऊन बसला. बापानें त्याच्या मस्तकाचें अवघ्राण केलें, हातांत कट्यार घेतली आणि मुलाला सस्नेह न्याहाळीत आपला मंत्र त्याला दिला :

> " गुरुजिर जय " काने काने कय
> " ए पुत्र, भय नाहि "

त्या सिंहगर्जनेचाच प्रतिसाद त्या सिंहशावकाच्या मुखांतून आला :

> ' नवीन वदने अभय किरणे
> ज्वलि उठे उत्साहि
> किशोरकण्ठे कँपि सभातल
> बालक उठिल गाहि
> " गुरुजिर जय, किछु नाहि भय "
> बन्दार मुख चाहि '

त्यानंतर—

> ' बन्दा तखन वामबाहुपाश
> जडाइल तार गले
> दक्षिणकरे फेलेर वक्षे
> छूरि बसाईल बले
> " गुरुजिर जय " कहिया बालक
> लूटालो धरणीतले

सावरकरांच्या कवितेंत या अबोध अजाण निरागस बालकाचें दर्शन आहे परंतु त्याच्या स्वतःसिद्ध शौर्याचें निदर्शन नाहीं. इतिहासांतील वस्तुस्थिति कोणती आहे याची मला माहिती नाहीं. अशा कथांतून सर्वसाधारणपणें आढळतें त्याप्रमाणें इतिहास व दंतकथा यांचें विलक्षण मिश्रणहि अशा कथांतून झालेलें असतें. परंतु 'प्रकाशयोजना' आणि 'लक्ष्यकेन्द्र' (focus) यांत दोन कवींनीं दाखविलेला हा भेद मात्र लक्षांत घेण्याजोगा आहे.

सावरकरांच्या साऱ्याच वाङ्मयांत पराक्रमाची पूजा आहे आणि षंढ भीरुतेचा द्वेष आहे. वीर बन्दा व त्याचे वीर आपली आहुति देत असतांना ज्या निमूट कायर कुतूहलानें सारा हिंदुसमाज त्यांची ती विटंबना पहात उभा होता, त्याच्याविषयीं अत्यंत जळजळीत असे उद्गार सावरकरांनीं काढले आहेत. बन्दी वीर राजमार्गावरून आणले जात असतां तें दृश्य पहावयास बघ्यांची नुसती झुंबड उडाली. रवीन्द्रनाथ त्याचें यथार्थ वर्णन करतातः

> ' राजपथ परे लोक नाहि धरे
> वातायन जाय खुली '

परंतु रवीन्द्रनाथ एवढें वर्णन करूनच थांबतात. शेवटींहि 'सभा हल निःस्तब्ध' एवढेंच सांगून प्रेक्षकगणांच्या कायरवृत्तीवर ते पडदा सरकवितात. परंतु या दृश्यानें सावरकरांच्या अंगाची लाही लाही होते. निर्भर्त्सनेला आपले शब्द अपुरेच पडतील असेंच जणूं त्यांच्या प्रतिभेला वाटतें !

> ' हिंदूंच्या बीजाचे लक्ष लक्ष ते
> जन, असुनी दोन हात, लांब मिशाही
> बहु मिशाळ षंढाहुनि षंढ होउनी
> हिंदूंच्या धर्मरक्षित्यासि पाहती
> त्या दशेंत, त्या दुर्बीभर्त्सतेमधें !!
> एक जरी मायेचा पूत त्यांमधें—
> आईचें दूध जितें एक प्यायला
> जरि असेल त्यांत तरी शपथ ! धिक् अरे
> धिक् तुमच्या जीवितास ! '

धर्मरक्षण हेंच ज्या वेळीं स्वत्वरक्षणहि होतें त्या काळांतील ही कथा आहे. धर्मावरील अत्याचार हे त्या काळीं जनतेच्या स्वातंत्र्यावर होणारे आघात होते. या



अनुक्रमणिका






आक्रमणाविरुद्ध उभे राहिलेल्यांची पूजा करावी व त्या आक्रमणाचे अत्याचार कायर कुतूहलानें पहाणाऱ्या कीटकांचा द्वेष करावा हेंच त्या काळांत स्वाभाविक झालें असतें. सावरकरांची हीच प्रतिक्रिया आहे. रवीन्द्रनाथांना हें दर्शन तितकें महत्त्वाचें वाटलें नाहीं याचें कारण या दोन कवींच्या रक्ताचा धर्मच वेगळा आहे हें असावें. रवीन्द्रनाथांची मुख्य प्रेरणा कलेची आहे. सावरकरांची क्रान्तीची आहे.

**रवीन्द्रनाथांची** कविता वीर बन्दा याचा वध होतांच तेथेंच कलात्मक विराम घेते. सावरकरांचा 'श्री बन्दा वीर' हा तर 'मूर्ति दुजी ती' या कवितेचा केवळ मध्यमणि आहे. पहिल्या विभागांत सावरकरांनीं आपल्या कवितेला आपलें नेहमीचें कमनीय रूप टाकून देऊन प्रसंगाला साजेसें करालकालिकेचें रूप धारण करून प्रकट होण्याची विनंति केली आहे. 'श्री बन्दा वीर' हा त्या करालकवितेचाच एक आविष्कार. श्रीबन्दा या नांवाच्या जपानें, त्या कोठडींत, फांशीच्या त्या गडद होणाऱ्या छायेंत या वीराच्या मनाला पुन्हा नवेंच धैर्य प्राप्त होतें. अंतरांतील कोलाहल निवूं लागतो, संदेह नाहींसे होऊं लागतात. आणि शांत निश्चयी धीर उद्गारांच्या प्रतिज्ञेनें ही कविता संपते.

'हें सहेनची
याहुनिही भयद असे छळ सहेनची
परि झटेन जीवनान्तिहि झटेनची
करण्यासी ही विमुक्त मातृभू पुन्हा
मुक्त पुन्हा, शक्त पुन्हा, मनुजमंगला
पुण्यभूमि पुनरुत्थित पतितपावना.'

एका कृतिशील स्वातंत्र्यवीराची ही प्रतिज्ञा आहे :

'मुक्त पुन्हा, शक्त पुन्हा, मनुजमंगला
पुण्यभूमि पुनरुत्थित पतितपावना.'

भारताच्या ध्येय-स्वप्नाचें या दोन ओळींत केलें आहे इतकें उत्कट नेमकें निदर्शन दुसऱ्या कुणाहि कवीनें केलेलें सहसा आढळणार नाहीं. 'जिथें सारीं मनें निर्भय आहेत आणि मानवाचें मस्तक उन्नत आहे' या रवीन्द्रनाथांच्या सुंदर गीताची स्मृति ठेवूनहि मला असेंच म्हणावेसें वाटतें.

## धर्मांत बदल नको, जीवनांत हवा !

हिंदुस्थान पहायाला आलेले एक अमेरिकन प्रवासी शृंगेरीपीठाचे शंकराचार्य श्रीचन्द्रशेखर भारतीस्वामी यांना नुकतेच भेटले. त्या अमेरिकन प्रवाश्याची हिंदु धर्मांत यायची इच्छा होती. त्याबाबत शंकराचार्यांनीं त्यांना जो सल्ला दिला त्यावरून धर्मान्तर करण्याबाबत हिंदुधर्माची भूमिका स्पष्ट होते. त्यांचा झालेला संवाद संक्षेपानें पुढें दिला आहे :

**अमेरिकन:**– परधर्मीयांना तुम्ही हिंदु धर्मांत कां घेत नाहीं ? तुमचा धर्म किती छान आहे ! तुम्हीं 'हो' म्हणा, मी आज हिंदु व्हायला तयार आहे.

**शंकराचार्य:**– धर्मांतर करायची तुम्हांला जरूरच काय ? खिस्त धर्म काय वाईट आहे ?

**अमेरिकन:**– ( अनपेक्षित उत्तरानें गोंधळून जाऊन ) तें मला नाहीं सांगतां येत. पण मला तरी खिस्तधर्मानें समाधान मिळालेलें नाहीं.

**शंकराचार्य:**–असं असेल तर दुर्दैव खरं ! पण मला सांगा कीं खिस्ताचा धर्म खरा समजून घ्यायचा, त्या-प्रमाणें जीवन जगायचा तुम्हीं खरोखरीं प्रयत्न केला आहे का ?

**अमेरिकन:**–तसा मी प्रयत्न केला आहे असें म्हणतां येणार नाहीं.

**शंकराचार्य:**– मग माझा तुम्हांला सल्ला असा कीं तुम्हीं पहिल्यांदा खरे खिस्ती बना, खिस्ताच्या वचना-प्रमाणें जीवन जगा. परिवर्तनाची जरूर आहे खरी. पण ती धर्माच्या परिवर्तनाची नव्हे तर जीवनाच्या परि-वर्तनाची आहे.

**अमेरिकन:**–(हर्षानें) मग तुमच्या हिंदुधर्माची अशी शिकवण आहे तर कीं खिश्चनानें चांगला खिश्चन बनावें, मुसलमानानें चांगला मुसलमान बनावें, बौद्धानें चांगला बौद्ध बनावें ! आज तुमच्या हिंदुधर्माच्या एका निराळ्याच उदात्त तत्त्वाचें मला भव्य दर्शन झालें आहे. हें दर्शन आपण करून दिल्याबद्दल धन्यवाद.

वरील संवाद 'हरिजना'च्या संपादकांनीं देऊन पुढें म्हटलें आहे कीं, धर्मांतराबाबत गांधीजींची भूमिका अशीच होती.

'**हरिजन**' —( २१।११।५३ वरून संक्षिप्त ).



अनुक्रमणिका







अमेरिकन् समाजांतील एका शक्तिकेन्द्राचें विवेचन : प्रा. श्री. वा. काळे

# अमेरिकन समाजाची घटनाप्रियता (Constitutionalism)

प्रत्येक समाजाच्या दैनंदिन घडामोडींत विशिष्ट व्यक्तींना, संस्थांना किंवा तत्त्वांना महत्त्व असतें. इंग्लिश लोकांच्या जीवनांत राणी एलिझाबेथ् रोज काय करते एतद्विषयक बातम्यांच्या चर्चेला अग्रस्थान मिळतें. कुटुंबांतील चार माणसें एखाद्या निमित्तानें एकत्र आलीं कीं राजाराणी हा विषय निघालाच नाहीं असें सहसा व्हायचें नाहीं ! नुसती या विषयावर चर्चा होऊनच काम भागत नाहीं. समजा, अशाच एका कुटुंबांतील गृहिणीस दुसऱ्या दिवशीं एक स्कार्फ् विकत घ्यायचा आहे. प्रथमतः तिच्या मनांत विचार येतील कीं, " काल लंडनच्या विमानतळावरील स्वागताच्या वेळीं राणीनें एक विशिष्ट स्कार्फ् वापरला असें 'टाइम्स्' म्हणतो. अगदी तोच स्कार्फ् घेणें आपल्या या जन्मांत शक्यच नाहीं. पण तद्वत् दिसणारा, साधारणतः त्याच रंगाचा, तितकाच लांबरुंद स्वस्त स्कार्फ् मिळतो कीं नाहीं हें उद्यां संध्याकाळीं कामावरून परत येतांना सल्फ्रिज्मध्यें पाहूं या तर खरें ! म्हणजे मैत्रिणींनीं तो पाहिल्यावर, निदान या बाईला आजकालची फॅशन्हि माहीत नाहीं असं म्हणण्यास तरी कोणी धजणार नाहीं ! " एखाद्या साध्याभोळया इंग्लिश गृहिणीच्या मनांत असे विचार यावेत याचें कारण राणीच्या दैनंदिन वागणुकीचा तिच्या मनावर तत्काल होणारा परिणाम, निराळया शब्दांत, एलिझाबेथ्चें समाजांतील वजन किंवा आज शतकानुशतकें राणीकडे आपल्या सर्व शक्तिसर्वस्वाचें केन्द्र म्हणून पाहण्याची इंग्लिश लोकांची सवय. तीच गोष्ट रशियामध्यें ग्योर्गी मालेन्कॉफ् आणि चीनमध्यें माओ-त्से-तुंग् यांची असणें शक्य आहे.

### इंग्रजांचें शक्तिकेन्द्र : 'क्राऊन'

अमेरिकन् लोकांचा दैनंदिन घडामोडीचा जो स्वल्प स्वानुभव आपल्या पदरीं आहे त्याच्या आधारें व या विषयावर इतरांनीं प्रदर्शित केलेल्या मतांच्या आधारें, अमेरिकन् समाजांतील सर्वमान्य असलेल्या एका शक्तिकेन्द्राची चर्चा येथें करावयाची आहे. अमेरिकन् लोक एकमेकांहून कितीहि भिन्नरुचीचे असले तरी शेवटीं त्या सर्वांना जवळ आणणारी अशी एक मोठी शक्ति त्यांच्यांत आहे. घटनाप्रियता किंवा 'घटनाश्रेष्ठत्ववाद' ( Constitutionalism ) हे तिचें अत्यंत सुटसुटीत वर्णन आहे.

वर असें सांगितलें कीं इंग्लंडची राणी हें त्या देशाचें सर्वांत प्रमुख शक्तिकेंद्र आहे. पण अट्लांटिक् महासागर ओलांडून नव्या जगांत पाय ठेवल्यावर असें वाटतें कीं प्रत्येक अमेरिकन् स्त्री स्वतःस अनभिषिक्त राणीच मानते. तिथें सिंहासनाधिष्ठित राणीपद कोणासच नाहीं. फार काय, इंग्लंडच्या राणीसहि भोगण्यास मिळणार नाहींत अशीं स्वर्गसुखें प्रत्येक अमेरिकन् स्त्रीस भोगतां यावींत, तिला लुटपुटीचें औटघटकेचेंच कां होईना पण सम्राज्ञीपद मिळावें अशा हेतूनें कित्येक अमेरिकन् रेडिओकेन्द्रांवरून रोज सकाळीं ११ वाजतां " Jack Bailey and Queen for a Day " या नांवाचा एक कार्यक्रम ठेवलेला असतो. "We want to make every single American woman Queen for a Day" असा त्यांचा दावा असतो ! या चढाओढींत जी गृहिणी पहिली येईल तिच्यावर बक्षिसांची व समारंभ, मेजवान्या व सत्कार यांची अशी खैरात करण्यांत येते कीं बोलून सोय नाहीं ! उदाहरणार्थ, प्रख्यात बॉब् होप् यांच्याबरोबर कॅलिफोर्नियाच्या समुद्रकिनाऱ्यावरील प्रख्यात हॉटेलांत जेवण, फिल्को कंपनीकडून २१ इंच रुंदीचा टेलेव्हिजन् सेट बक्षिस इत्यादि. अशी प्रतिष्ठा करून घेण्याची इंग्लंडच्या राणीस इच्छा झाली तरी शक्य होणें कठीण ! राणीनें अशा चढाओढींत भाग घेतलाच अशी अतर्क्य कल्पना करा. दुसऱ्या दिवशीं पार्लमेंटमध्यें काय ठराव येईल हें सांगणें हेंहि तितकेंच कठीण. यांतील विनोदाचा भाग सोडला तरी सांगण्याचा मुद्दा असा कीं इंग्लिश समाजाविषयीं बोलतांना Crown हें इंग्लिश लोकांचें एक शक्तिकेन्द्र आहे असें मानणें योग्य आहे. आणि या भावनेस बहुतेक वेळां वैयक्तिक स्वरूप येतें.









## अध्यक्षापेक्षां घटना श्रेष्ठतर

पण अमेरिकन् समाजाचें तसें नाहीं. त्यांना व्यक्तीपेक्षां घटना अधिक आदरणीय वाटते. मग ती व्यक्ति कितीहि उच्च दर्जाची असो. कमेजर म्हणतो : "...... he venerated Law. It was his pride that every American was equal before Law, that no one–not even the highest official – was immune from the operation of Law. In his country alone, constitution was supreme Law......While the American indulged recklessly in the most scurrilous criticism of his President or his Congress, he would scarcely tolerate criticism of his Supreme Court." ('The American Mind', pp. 19 – 20.) कोणी असें म्हणतील कीं अमेरिकेच्या अध्यक्षास समाजाच्या शक्तीचें केन्द्र मानतां येणार नाहीं का ? याचें उत्तर सर्व दृष्टींनीं विचार केला असतां "नाहीं" असें द्यावें लागेल. अध्यक्षपदावर बसलेल्या व्यक्तीचा प्रभाव अमेरिकेवर त्या वेळेपुरता पडतो हें खरें. प्रे. रुझवेल्ट् यांचें व्यक्तिमत्त्व इतकें प्रभावी होतें कीं ते चार वेळां अध्यक्ष होऊं शकले. ते नसते तर दुसऱ्या महायुद्धांत पडण्यास लागणारी अमेरिकेची मानसिक तयारी इतक्या लवकर झाली नसती. परन्तु अमेरिकनांना त्यांच्याविषयीं वाटणारा आदर नि प्रेम ही पुष्कळ वेळां भीतिमूलक अथवा द्वेषजन्य होती असें कित्येक चरित्रकार मानतात. इंग्लंडमध्यें ' The Crown can do no wrong ' हें तत्त्व आज कित्येक शतकें रूढ आहे व तें अनेक वेळां पाळलें गेलें आहे. पण 'The President can do no wrong ' हें खरें का, असें एखाद्या अमेरिकनास विचारा. लगेच तो म्हणेल : " Oh ! don't be silly ! why, he makes mistakes by gross every time he turns around ! " प्रे. हॅरी टुमन् हे अध्यक्ष असतांनाहि त्यांना ' इंपीच ' करण्यास निघालेले अनेक सेनेटर् आहेत.

इंग्लंडच्या राणीप्रमाणें अमेरिकेच्या अध्यक्षांना तितक्या मानाचें व आदराचें स्थान नाहीं हें पुढील उदाहरणावरून सिद्ध होईल. आणि त्याच उदाहरणांवरून अमेरिकेची घटना, तिच्या विषयीं निवाडा देणारें जें अत्युच्च न्यायालय "Supreme Court" त्याला कसें अग्रस्थान आहे हेंहि स्पष्ट होईल. १९५२ च्या वसंत-ऋतूंत अमेरिकेंतील पोलादधंद्यांचे कारखानदार, व त्यांचा कामगारवर्ग यांच्यामध्यें एक मोठा तंटा सुरू झाला. कामगारवर्गानें नवीन वर्षाचे करार ठरवितांना जास्त रोजगाराची मागणी केली. मालकवर्गानें असें उत्तर दिलें कीं सरकार जर पोलादाचा भाव दर टनामागें कांहीं विशिष्ट रकमेनें वाढवून देत असेल, तरच कामगारवर्गानें मागितलेली पगारवाढ देणें शक्य आहे. झालें, प्रथम प्रे. टुमन् यांच्या सरकारनें मालकवर्गाची बाजू घेतली आणि टॅफ्ट्-हार्टले लॉ ( T-H Law ) या कामगारवर्गानें ' काळया ' ठरविलेल्या कायद्याचा अवलंब करून कामगारांना सक्तीनें कामाला लावलें. त्यानंतर कांहीं महिन्यांनीं सरकारनें कामगारवर्गाची बाजू घेऊन सर्व पोलादाचें उत्पादन आपल्या हातीं घेतलें; प्रत्येक कारखान्याच्या गेटावर " ही अमेरिकेची मिळकत आहे " ( This is U. S. property ) अशा पाट्या लावल्या; मालकवर्गास नुसतें व्यवस्थापक म्हणून काम बघण्यास सांगून आपल्या पुढारीपणाखालीं गिरण्या चालू केल्या. कामगारांना जणूं कांहीं 'संप करतों' म्हटल्याचें बक्षिस म्हणून सन्मानानें परत बोलावलें. या सर्व वादांत मालकवर्ग, सरकार, कामगार या तिघांचेहि थोडेथोडे प्रमाद झाले असें अनेक कायदेपंडितांचें मत आहे. पण हा बखेडा शेवटीं 'एक घाव, दोन तुकडे' या न्यायानें कोणी सोडविला असेल तर प्रथम जज्ज् पाईन् यांनीं. सुप्रीम कोर्टनेंहि पुढें पाईन् यांचें म्हणणें मान्य करून खास हुकुमानें प्रे. टुमन् यांच्या सरकाराचें वर्तन घटनाबाह्य ठरवलें. कारखाने ज्यांचे त्यांना परत करण्याला हुकूम निघाल्यापासून कांहीं तासांच्या आंत प्रे. टुमन् यांनीं निमूटपणें कारखाने मालकवर्गास परत दिले. त्या वेळीं ते म्हणाले कीं, " मी अध्यक्ष असलों तरी कायदा व घटना माझ्या पदाहून श्रेष्ठतर आहेत. आणि तीं तशीं आहेत म्हणूनच मी अमेरिकन् आहे. "

## व्यक्तीच्या स्वातंत्र्याचा जाहीरनामा

अमेरिकन् लोकांना घटना ही सर्वश्रेष्ठ वाटते या









अनुक्रमणिका

गोष्टीमागें फार मोठा इतिहास आहे. अठराव्या शतकाच्या शेवटल्या दोनतीन दशकांत अमेरिकेच्या राज्यघटनेचा पाया जॉर्ज वॉशिंग्टन्, जेफर्सन्, ॲडम्स, हॅमिल्टन्, मॅडिसन् इत्यादि राष्ट्रपितामहांनीं घातला. आणि इतिहासकारांचें असें मत आहे कीं त्यांनीं इंग्लंड, फ्रान्स इत्यादि देशांना पूर्वी ज्या ठेंचा लागल्या त्या लक्षांत घेऊन मोठ्या शहाणपणानें व द्रष्टेपणानें आपल्या नवोदित राष्ट्राची घटना तयार केली. या थोर पुरुषांनीं असा विचार केला कीं युरोपांतील जीर्ण सरंजामशाही, पोपशाही अथवा घटनाबद्ध राजशाही देखील नव्या जगांत दिसतां कामा नये; येथें कोणत्याहि उच्च अधिकारावर असलेल्या व्यक्तीची इतरांनीं स्वतःस हलकें समजून विभूतिपूजा करूं नये; येथें अलिखित कायद्याच्या नांवाखालीं हुल्लडशाही माजूं नये; शेवटीं समाजरूपी समुद्र कितीहि खवळला आणि चांगल्या सुबुद्ध लोकांचीहि बौद्धिक दृष्ट्या वाताहत झाली, तरी सर्वसाधारण व्यक्तीला संपूर्ण विश्वासानें तरून जातां येईल अशी कलमबद्ध घटनारूपी नाव नेहमीं तयार असली पाहिजे. या विचारांनीं उत्स्फूर्त होऊन त्यांनीं प्रथम अत्यंत सोप्या, निःसंदिग्ध व ओजस्वी भाषेंत प्रत्येक व्यक्तीचें स्वातंत्र्य जाहीर केलें. Declaration of Independence या कॉंग्रेसनें ४ जुलै १७७६ रोजी पास केलेल्या स्वातंत्र्यनाम्यांत ते म्हणतात :

" We hold these truths to be self-evident that all men are created equal, that they are endowed by their Creator, with certain inalienable rights, that among these are life, liberty and the pursuit of happiness. That to secure these rights, governments are instituted among men, deriving their just powers from the consent of the governed, that whenever any form of government becomes destructive of these ends, it is the right of the people to alter or to abolish it and institute a new government, laying its foundations on such principles and organizing its power in such form as to them shall seem most likely to effect their safety and happiness. "

### न्यायदेवतेची नजर

वरील हक्क अबाधित राखण्याकरितां कायद्याच्या भाषेंत ज्याला Judicial Review असें म्हणतात अशा तत्त्वाची सोय त्यांनीं घटनेमध्यें मुद्दाम करून ठेवली. 'ज्युडिशिअल् रिव्ह्यू' याचा अर्थ सरकारचा कोणताहि निर्णय आपल्या नजरेखालून पुनः एकवार घालण्याचा हक्क न्यायदेवतेस आहे. न्यायदेवता ही अशा प्रकारें आंधळी, कांटेकोर व निष्ठुर आहे यावर अमेरिकन् जनतेचा असलेला विश्वास आंधळा नसला तरी कांटेकोर व निष्ठुर आहे. याला मुख्य कारण म्हणजे घटना तयार करतांना 'ज्युडिशिअल् रिव्ह्यू' चें तत्त्व मुद्दाम घालण्यांत आलें हें होय.

कायद्याविषयीं आणि कोर्ट् त्याचा जो अर्थ करील तो प्रमाण मानून चालण्याची बुद्धि अमेरिकन् समाजांत सर्वसाधारण व्यक्तींत जशी दिसून येते, तशीच अत्यंत उच्च अधिकारपदीं असलेल्या व्यक्तींतहि ती दिसून येते. यासंबंधीची अगदी ताजी गोष्ट म्हणजे ज्युलियस् व एथेल रोझेनबर्ग् यांच्या खटल्याची. आठ वेळां अपील होऊनहि रोझेनबर्ग् दांपत्याची फांशीची शिक्षा सुप्रीम कोर्टांत कायम केली गेली. ती रद्द करून जन्मठेपेची करण्याचा अधिकार प्रे. आयसेन्हॉवर यांना होता, आणि 'तो अधिकार वापरून गुन्हेगारांना दया दाखवा' असे कित्येक विनंति-अर्ज जगाच्या सर्व भागांतून त्या वेळीं येत होते. पण प्रेसिडेंट् शेवटपर्यंत स्थितप्रज्ञ राहिले. या त्यांच्या धोरणामागें कम्युनिझमला आळा घालणें हा राजकीय हेतु तर होताच. पण आणखी एक कारण त्यांनीं वरील विनंत्यांना उत्तर म्हणून काढलेल्या पत्रकांत दिसून येईल. ते म्हणाले कीं "उच्च न्यायदेवतेनें रोझेन्बर्ग दांपत्याला फांशीची शिक्षा दिली व कायम केली. हें कृत्य सर्व पुराव्याचा विचार करून, सत्य आणि न्याय या तत्त्वांना अनुसरूनच केलें असलें पाहिजे. त्यांनीं दिलेल्या न्यायांत मी ढवळाढवळ करणें अन्याय होईल." प्रे. आयसेन्हॉवर यांच्या पत्रकाबद्दल अमेरिकेंत त्यांच्यावर टीका न होतां उलट










प्रशंसोद्गार काढण्यांत वृत्तपत्रांची चढाओढ लागली होती, हेंहि तेथील लोकांचें मन कसें चालतें हें समजण्याच्या दृष्टीनें महत्त्वाचें आहे.

आतांपर्यंतच्या विवेचनाचा सारांश हा कीं अमेरिकेंतील सामाजिक जीवनांत कायदा, घटना, न्यायालय या कल्पनांचा प्रभाव जबरदस्त आहे. परंतु कांहीं जणांना हें मत पटणार नाहीं. त्यांचे त्यावरील आक्षेप दोन प्रकारचे असूं शकतील :

पहिला आक्षेप हा कीं एखाद्या समाजांत घटना, कायदा या कल्पना जिवंत शक्तिस्थानें आहेत हें पटत नाहीं. विशेषतः अमेरिकेची घटना जवळजवळ आहे त्या शब्दांत १७५ वर्षांपूर्वींच लिहिली गेली असतां आजमितीसहि ती जिवंत शक्ति (live force) म्हणून कशी राहूं शकेल ?

दुसरा आक्षेप असा आहे कीं वृत्तपत्रांतून आपण हजारों वेळां अमेरिकेंतील बातम्या वाचतों त्यांत किंवा हॉलिवुडहून इकडे येणारे चित्रपट पाहतों त्यांत अमेरिकन् लोक कायदा पाळतात असें फारसें नसतेंच. बहुतेक सर्व बातम्या अथवा कथानकें अपघात, मारामाऱ्या, खून, दारूबाजी, लैंगिक गुन्हे यांनीं भरलेलीं असतात. फार काय अमेरिकन् लोकांच्यासारखे बेकायदेशीर (lawless) जीवन जगणारे लोक जगाच्या पाठीवर दुसरीकडे असतील कीं नाहीं याची शंकाच वाटते !

यांतील पहिला आक्षेप अजाणतेपणानें केला असला तरी भारदस्त आहे. दुसरा आक्षेप वरकरणीं सत्य वाटला तरी पोरकट आहे.

### जन्मापासून लोकशाहीचें बाळकडूं

सुमारें १७५ वर्षांपूर्वीं तयार केलेल्या कायद्याच्या चोपड्यास एखाद्या समाजांत इतकें स्थान आहे, तें चोपडें समाजपुरुषाचें आरोग्य कसें राखतें, आणि प्रसंगीं इकडच्या गोष्टी तिकडे करण्यास मागेपुढें कां पहात नाहीं—या प्रश्नांचा विचार खरोखरीं बारकाईनें व्हावयास हवा. या उलट आपल्या देशाची नुकतीच तयार झालेली घटना कागदोपत्रीं सर्वगुणसंपन्न वाटते. पण प्रत्यक्षांत तिला कित्येकदां गुंडाळून ठेवण्यानेंच तिची अंमलबजावणी कशी होते हेंहि अभ्यासण्यासारखें जरूर आहे. लेखकाच्या मतें आपणाला या बाबतींत पुष्कळच प्रगति करायची आहे. याचें कारण म्हणजे खरीखुरी लोकशाही म्हणजे काय याचें शिक्षण आपणांस आतां कुठें मिळूं लागलें आहे. पण अमेरिकेचें तसें नाहीं. व्यक्तीचें स्तोम फार न माजविणारी आणि तरीदेखील बलशाली अशी घटना तेथें अखंड पाळण्यांत आली गेली आहे. याचें कारण त्या देशाच्या जन्मापासूनच लोकांना लोकशाहीचें बाळकडूं मिळालें आहे. केवळ राजकारणांतच नव्हें तर व्यक्तीव्यक्तींचा परस्परसंबंध येणाऱ्या अनेक क्षेत्रांत, परस्परसमानता राखणें व ती वाढवणें त्यांना जमून गेलें आहे. इतर राष्ट्रांप्रमाणें लोकशाहीचा प्राणवायु, अगदीं गुदमरल्यासारखें होऊन गेलें असतां, मिळाला असें अमेरिकेंत न होतां, तो प्राणवायु बाळपणापासून अखंड मिळत राहिला. त्यामुळें त्यांना आपण लोकशाही राष्ट्र आहोंत अशी सारखी व स्वतंत्र जाणीव ठेवणें अवघड वाटत नाहीं. लोकशाही पद्धतीनें दैनंदिन व्यवहारांत वागणें सहजगत्या होत असल्यानें शिक्षणांतून, सभांतून, वादविवादांतून समाजधुरीणांना लोकशाहीचीं अशीं स्वतंत्र तत्त्वें सांगण्याची जरूर न भासतां ती लोकशाही ज्यांत ग्रथित केली आहे त्या घटनेचें ज्ञान लोकांना अधिकाधिक कसें होईल याची काळजी वहावी लागते. राज्यघटनेच्या सर्वश्रेष्ठत्वा-(Supremacy of the Constitution किंवा Constitutionalism) ची आठवण पुनः पुनः जनतेस करून द्यावी लागते. ही गोष्ट अगदीं बालवयाच्या नागरिकांच्या मनांतहि बिंबविण्याचा प्रयत्न करण्यांत येतो. उदाहरणार्थ, अमेरिकन् बालवीर जी शपथ घेतात त्यांतहि 'Constitution of the United States' विषयीं त्यांना शिकवण्यांत येणारी निष्ठा फारच स्पष्ट रीत्या मांडली आहे. म्हणून वुड्रो विल्सन् यांचे या बाबतींतील उद्गार यथार्थ वाटतात. ते म्हणतात :

"The Constitution is not mere lawyer's document; it is a vehicle of life, and its spirit is always the spirit of the age."

### 'फ्रांटिअर डेज्'ची पार्श्वभूमि असलेले चित्रपट

आतां दुसऱ्या आक्षेपाचा संक्षिप्त विचार करूं सर्वसाधारण अमेरिकन् नागरिकांचें जीवन बेबंद असतें अशी कल्पना करून घेणें वस्तुस्थितीस सोडून होईल. चित्रपट, लघुकथा, कादंबऱ्या यांत रंगवलेले खून, अपघात, मारामाऱ्या, दारूबाजी, लैंगिक गुन्हे हे केवळ

अमेरिकेंतच होतात आणि आपल्या देशांत होत नाहींत असें नाहीं. त्यावरून सर्व समाजाविषयीं विकृत कल्पना करून घेणें रास्त नाहीं. दुसरी गोष्ट अशी कीं हे प्रसंग ज्या चित्रपटांत दाखविलेले असतात ते वेस्टर्न किंवा ' पाश्चात्त्य ' पार्श्वभूमीवर आधारलेले असतात. ' पाश्चात्त्य ' पार्श्वभूमीवर आधारलेले चित्रपट याचा अर्थ असा कीं एकोणिसाव्या शतकांत जेव्हां युरोपियन् वसाहतवाले उत्तर अमेरिकेंत येऊन रेड इंडिअन्स् लोकांना मागें रेटीत रेटीत पश्चिमेकडे अमेरिकेची सरहद्द वाढवीत होते त्या काळाच्या (frontier days च्या) पार्श्वभूमीवर आधारलेले चित्रपट. त्यांत दाखविलेले प्रसंग त्या काळीं खरे असले तरी ते आतांच्या काळाचे प्रातिनिधिक नाहींत. विसाव्या शतकाच्या पार्श्वभूमीवरहि असे चित्त थरारविणारे बोलपट हॉलिवुड् काढतें. पण त्यांचें चित्रणहि हॉलिवुड्-पद्धतीनें अतिरंजित व भडक रंगांत दाखविलेलें असतें. या विषयावर कित्येक सुबुद्ध अमेरिकन नागरिकांशीं चर्चा करतांना लेखकास असें दिसून आलें कीं, सर्वसाधारण अमेरिकन् नागरिक हॉलिवुडमुळें त्यांच्या देशाची बाहेरील जगांत जी बदनामी होते तिला कंटाळलेला आहे. अमेरिकेचें यथार्थ दर्शन इतर खंडांतील लोकांना कसें होईल याकरितां विश्वविद्यालयें, जनतेचे प्रतिनिधी व सरकार यांचा गंभीर विचार चालू आहे. याचें मुख्य कारण असें कीं त्यांच्या मतें उच्छृंखलतेचा केवढाहि मोठा भाग बाजूला केला तरी शेवटीं सर्वसाधारण अमेरिकन् नागरिक प्रामाणिक, स्वकर्तृत्वावर विश्वास ठेवणारा, धर्मनिष्ठ व घटनेंत सांगितलेल्या तत्त्वांची चाड बाळगणारा असाच आहे.

**'वयांत आलेला व्यक्तिवाद'**

अमेरिकेंत व्यक्तिस्वातंत्र्य आहे ही गोष्ट महशूरच आहे. परंतु एके काळीं त्याचा अर्थ 'अनिर्बंध जीवन', 'हम करे सो कायदा' असा केला जात असे. पण तो अर्थ व्यक्तिस्वातंत्र्याच्या कल्पनेंत असूं नये, असा प्रयत्न प्रे. ॲब्राहाम् लिंकन्-सारख्यांनीं सतत केला. त्यांनीं एके ठिकाणीं म्हटलें आहे : " Those, who deny freedom to others, deserve it not for themselves and, under a just God, will not long retain it. " काळहि आतां पालटला आहे. आतां एका व्यक्तीच्या स्वातंत्र्यास दुसऱ्या व्यक्तीच्या स्वातंत्र्याची मुरड घालावी लागते हें मान्य केलें जातें. कांहीं राज्यशास्त्रज्ञांच्या भाषेंत सांगायचें म्हणजे अमेरिकेंतील व्यक्तिस्वातंत्र्याच्या कल्पनेंतील बालसुलभ अल्पपणा जाऊन त्याची जागा आतां प्रगल्भ मनुष्याच्या ठिकाणीं दिसून येणाऱ्या प्रौढपणानें घेतली आहे ( 'Individualism has come of age' ). याचाच अर्थ व्यक्तीव्यक्तींच्या संबंधांत दिसून येणारी कायदापालनाची बुद्धि आतां खूपच वृद्धिंगत झाली आहे. म्हणून अमेरिकन् लोक बेकायदेशीर आहेत असें समजणें चुकीचें आहे. वरील सर्व विवेचनाचें सार हें कीं अमेरिकन् लोकांच्या मनांत पक्का रुजलेला 'घटनाश्रेष्ठत्ववाद' ( Constitutionalism ) अथवा त्यांची घटनाप्रियता हें त्यांच्या राष्ट्राचें अत्यंत महत्त्वाचें शक्तिकेन्द्र आहे. मतामतांचा गलबला त्यांच्यांत नाहीं असें नाहीं. पण विरोधी मतांचे प्रवाह कितीहि उलटसुलट दिशांनीं वाहत असतांना दिसले तरी ते शेवटीं एकमेकांत मिसळून जाण्यासहि फारसा वेळ लागत नाहीं.

घटनाप्रियतेमुळें त्यांचे विरोध लवकर मावळतात; एवढेंच नव्हे हरएक तऱ्हेचीं सामाजिक कार्यें करण्यासाठींहि त्यांना स्फूर्ति मिळते व उत्साह येतो. अमेरिकन् लोक अत्यंत समाजप्रिय ( gregarious ) व संस्थाप्रिय आहेत. नवीन संस्था काढणें व त्या कर्तबगारपणानें पुढें आणणें यांत त्यांचा हातखंडा आहे. पण हें कार्य करतांना त्यांना आपल्या देशाच्या घटनेचा इतका उपयोग होतो कीं एखाद्या नवीन संस्थेची घटना म्हणजे अमेरिकेच्या राज्यघटनेची एक छोटीशी आवृत्तीच असते. आणि त्या लहान संस्थेच्या कारभारांतहि प्रेसिडेंट्, व्हाईसप्रेसिडेंट्, सेनेट्, कोर्ट्, कन्व्हेशन्, इलेक्शन् असे शब्द अमेरिकेच्या राज्यघटनेचीच आठवण करून देतात. थोडक्यांत दोन किंवा अधिक अमेरिकन् नागरिक कोणत्याहि कार्याकरतां एकत्र आले कीं प्रथम त्याच दिवशीं त्या कार्याकरतां एक संस्था काढतील. संस्था म्हणजे तिला योग्य ती घटना पाहिजेच. आणि घटनेची आवश्यकता भासल्याबरोबर १७५ वर्षांपूर्वी आंखून दिलेल्या राज्यघटनेची व त्यांतील तत्त्वांची स्मृति त्यांच्या मनास स्पर्श करून गेल्याशिवाय रहात नाहीं.








राजरत्न वा. वि. जोशी

# कायद्याची मदत व सल्लागारमंडळें

कायदा हा माणसाच्या सर्व व्यवहारांचें, जिव्हाळ्याच्या नात्यागोत्यांचें नियंत्रण करीत असतो; म्हणूनच धर्मशास्त्रकार ‘ कायदा म्हणजे जगाचा आधार ’ असें स्पष्ट सांगत आले. तेव्हां कायद्याचें ज्ञान दरेकास असणें आवश्यक आहे.

## प्रतिक्षणीं वाढणारें कायदाशास्त्र

दरेकानें कायद्याचें ज्ञान मिळविणें हें अवश्य असल तरी तें अशक्य असतें. कायदा हें प्रतिक्षणीं वाढणारें एक शास्त्र आहे. त्यांत बदलत्या तत्त्वांचीं आणि अनेक नव्यानव्या तपशीलांची एकसारखी भर पडत असते, इतकेंच नव्हे तर वेळोवेळीं कित्येक तत्त्वं नाबूद होत असतात, तर कित्येक कायदेच रद्द होत असतात. म्हणूनच ह्या शास्त्राचा अभ्यास सामान्यजनाला दूरापास्त झाला आहे. त्या शास्त्राच्या अभ्यासावर उपजीविका करणाऱ्या वकील-वर्गालाहि सर्वत्र कायद्यांची संपूर्ण माहिती नसते. कुणी फक्त फौजदारी कायदाच जाणतो, तर कुणी फक्त दिवाणीच कायदा जाणतो, तर कुणी फक्त राजशासनविषयक कायदा जाणतो. एखादा आंतरराष्ट्रीय कायद्यांत निष्णात असेल तर दुसरा हिंदु-कायद्यांत प्रवीण असेल. एखादा अपील चालविण्यांत तर दुसरा मसुदे घडविण्यांत वाकबगार असेल. सर्व कायद्यांत प्रवीण असा वकील क्वचितच सांपडतो. मोठमोठे वकील असतात, ते आपण अमुक एका विषयांत जाणतो, दुसऱ्या विषयांत सल्लामसलत आपणांस देतां येणार नाहीं, असें स्पष्ट सांगतात. आणि गुड वकील हा लटपट्या वैद्याप्रमाणें सर्वज्ञ म्हणून सर्वच बाबतींत सर्वांनाच वकिली सल्ला देत असतो ! जन्या शास्त्रांत स्त्रियांना घटस्फोट मिळत असे कीं नाहीं हें जाणण्यासाठीं आपण जवळच्या ओळखीच्या कुठल्यातरी शास्त्रीबुवांना विचारतों. बरें, त्या शास्त्रीबुवांनीं ‘ मी आपला पुराण सांगतों, धर्मशास्त्र मी वाचलेलें नाहीं ’ असें सांगावें ना ! पण चालून आलेली सर्वज्ञाची कीर्ति आपोआप कमावण्यासाठीं, सत्यनारायण सांगणारे हे कुडमुडे शास्त्रीबुवा धर्मशास्त्रांत अमुक आहे, असें बेधडक ठोकून देतात ! तद्वतच गुंड वकील हा वाटेल त्या कायद्याबाबत खुशाल मत ठोकून देतो. वकीलपरीक्षा पास होण्यासाठीं जेवढीं पुस्तकें घेतलीं त्याच क्रमिक पुस्तकांवर पंचवीसतीस वर्षें वकिली करीत राहणारे वकील काय थोडे असतात ! शिवाय जवळच्या डॉक्टराकडून आपण हरेक रोगाचें निदान आणि उपचार करून घेतों, त्यावेळीं ही शस्त्रक्रियेची केस आहे असें आपण अगर तो डॉक्टर मनांत आणीत नाहीं. तद्वतच जवळच्या वकीलाचाच सल्ला लोक घेतात. त्यांत पुष्कळ वेळीं नुकसान होण्याची वेळ येते. ह्या शिवाय बगले वकील, कज्जेदलाल, लटपटे, खटपटी लोक हेहि कायद्याबद्दलचा सल्ला गोरगरीबांना चौफेर फुकट वाटीत असतात. कायद्याचें संपूर्ण ज्ञान त्यांना कोटांत नुसते खेटे घालण्यानें आपोआप मिळालेलें असतें अशी त्यांची आणि इतरांची प्रामाणिक समजूत. या अडाणी सल्ल्यामुळें माणसें असे कांहीं अनर्थकारक व्यवहार आणि घोटाळे करून ठेवतात, कीं अखेर निष्णात वकीलालाहि त्यांना वाचवितां येत नाहीं. जसा माणूस आपली प्रकृति बिघडवूं शकतो, व्याधि मरणापर्यंत वाढवूं शकतो आणि प्रत्यक्ष धन्वंतरीचेंहि कांहीं चालेनासें होते, तसाच माणूस रोजचे व्यवहार असे बिघडून ठवतो, स्वतःच्या वर्तनानें मिळणाऱ्या रक्षणाची अशी कांहीं हानि करून ठेवतो कीं कायदेपंडिताला अगर दयाशील न्यायाधीशाला त्या मूर्ख माणसाचा सर्वनाश थांबवितां अगर टाळतां येत नाहीं. म्हणून कायद्याचा सल्ला कुणाचा घ्यावा, केव्हां घ्यावा, आणि त्याप्रमाणें कसें व केव्हां वागावें या गोष्टी व्यक्तिमात्रानें जपावयाच्या असतात. त्यांत कांहीं गफलत झाली कीं सर्वनाश झालाच म्हणून समजावें.

## प्रामाणिक अज्ञान !

चांगल्याचांगल्या माणसांना आणि साधारण वकीलांनाहि अमुक एक कायदा काय आहे, हें सुद्धां








माहिती नसते. माझ्या पाहण्यांत तर अशीं उदाहरणें पुष्कळच आलीं. आणि त्याबद्दल मी कुणाला दोष देत नाहीं. कायदा हें शास्त्रच मूळचें अफाट आहे आणि त्यांत नवीन कायद्यांची प्रतिक्षणीं बेफाट भर पडत आहे. अशा स्थितींत दोष कोणाचाच नसतो. परंतु नुकसान मात्र ओढवतें तें अशा माणसांवर कीं जीं मिळालेल्या कायद्याच्या सल्ल्यावर विसंबून वागतात आणि तो सल्लाच मुळांत खरा व योग्य नसतो! नपुंसकाशीं लग्नच होणें अशक्य; पण असलें लग्न हेंहि कायदेशीर मानण्यांत येते, नपुंसकाला स्वतः वारसावांटणी मिळत नसे पण त्याच्या संततीला (?) वारसावांटणी मिळते-ही कायद्याची विलक्षण विचारसरणी साधारण बुद्धीच्या माणसाला पटावी तरी कशी? बायकोला नवऱ्यानें कोंडून ठेवलें, डागलें, मारलें तर त्याच्यावर फौजदारी होते, त्याला शिक्षा होते, हें कितीजणांना आणि कितीजणींना माहीत आहे! "पावसांनीं झोडलं, नवऱ्यानं मारलं तर दाद कुणाकडे मागणार?" ही साधी म्हण हीच जणूं कायद्याची योजना! पण ती म्हणच शेवटी घरोघरीं नवराबायकोच्या वैयक्तिक हक्कांचें नियंत्रण करीत आहे. नवऱ्याच्या मिळकतींत मुलाच्या बरोबरीनें विधवेला वारसावांटणी मिळते, ही गोष्ट किती बायकांना आणि किती वकिलांना माहित आहे? ज्या देशमुख–कायद्याला चौदा वर्षें झालीं, त्या कायद्याची जर ही दशा, तर रोज नव्या होणाऱ्या कायद्यांचें अज्ञान त्या मानानें उपेक्षणीयच ठरेल. नुकताच मला असा अनुभव आला, कीं ह्या देशमुख कायद्याची माहिती चांगल्या वकीलांनाहि नव्हती. महिलांच्या चळवळीच्या आघाडीवर भाग घेणाऱ्या व अशाच सरकारी कायदे सुधारणा-कमिटीवर काम करणाऱ्या सुशिक्षित भगिनींनाहि अगदीं त्यांच्या जिव्हाळ्याच्या प्रश्नांची खरी माहिती नव्हती. अन्नवस्त्राची भाषा अजून घरोघर ऐकूं येते व विधवा स्त्रिया अन्नवस्त्रावरच समाधान मानून रहात आहेत. हा भाबडा गोंधळ पाहिला म्हणजे उद्वेगहि वाटतो कीं, कायद्यांनीं कितीहि सुधारणा केल्या तरी त्या सुधारणा गरीब माणसें आणि स्त्रिया ह्यांच्या पदरांत कदापि पडावयाच्या नाहींत.

ही अगदीं प्रामाणिक अज्ञानाची कथा झाली. पण जिथें मात्र सर्वसामान्य अज्ञानाचा फायदा लबाड लोक घेतात, कायद्याचा खोटा सल्ला जाणूनबुजून कपटानें देतात, तिथें तर अनर्थाला पारावारच राहत नाहीं. विशेषतः अनाथ स्त्रिया ज्या ज्या वेळीं वकीली सल्ला घेण्यासाठीं स्थानिक वकीलांकडे जातात, त्या त्यावेळीं त्यांच्या पुरुष दावेदारांची कड घेऊनच खोटी सल्ला देण्यांत येते. कायद्याचा सल्ला देतांनाहि वकीलाला आपण कुणीतरी समाजस्वास्थ्याचे मुख्य संरक्षक आहोंत अशी ईर्ष्या उगीचच वाटूं लागते. जुन्या परंपरेप्रमाणें चालू समाजव्यवस्था चालू राहणें हेंच श्रेयस्कर मानून, कायद्यांत काय आहे हें निर्भीडपणानें सांगण्याऐवजीं तो नैतिक सल्लाच देतो. अशावेळीं वकील सांगतो त्यांतला कायदा किती, व्यवहार किती आणि त्याचा स्वतःचा उपदेश किती ह्याचा उलगडा न झाल्यामुळें वकील सांगतो तें सर्व कायद्यांत आहे, अशीच सामान्य माणसांची समजूत होणें साहजिक असते. दुःखित हा सभोंवार गराडा देऊन उभ्या राहिलेल्या संकटांनीं अगोदरच गांगरून गेलेला असतो. तशांत वकीलांनीं हातपाय गाळले कीं त्याला परिस्थितीशीं व दावेदाराशीं समेट वा शरणागति करावी लागते. कोर्टांत जाणें तर खर्चाची, खटपटीची बाब आणि कोर्टांत न्याय मिळवितांना होणारा कालावधि – ह्याहि भेडसावणाऱ्या गोष्टी असतातच. या सर्वांचा गोळाबेरीज परिणाम असा होतो कीं, नाडलेलीं माणसे आपले न्याय्य हक्क सोडून देतात आणि कायद्यांत दिलेलें रक्षणहि तीं मिळवूं शकत नाहींत.

येवढें करूनहि कुणी गोरगरीब कोर्टाची पायरी चढलाच तर त्याला कळून चुकतें कीं सर्व निसर्गच त्याच्याविरुद्ध जणूं खवळला आहे. जिथेतिथे अरेरावी, मगूरुरी आणि कृत्रिम नियमांचीं कुंपणे! न्यायाधीश लोक न्याय करीत नाहींत असे मुळींच नाहीं. परंतु गरीबाकडे मेहेरनजरेने पहाण्याचे, त्यांचे योग्य रक्षण होत आहे कीं नाहीं याची खबरदारी घेण्याचें त्यांना प्रयोजनच वाटत नाहीं. समोर येईल तेवढीच हकीगत, वकील समजावतील तेवढीच कायद्याची हकीगतीची तक्रार, ह्या अभिनिवेशाने कोर्टांत आज काम चालते. तेव्हां साधारण माणसाला न्याय हा महाग पडतोच. शिवाय, त्याच्या आटोक्याबाहेरचा तो वाटतो म्हणूनच गरीब, अनाथ माणसे कोर्टांत जात नाहींत, बलिष्ठांचे वर्चस्व निमूटपणे मान्य करतात. एका अर्थानें 'बळी तो










अनुक्रमणिका

कान पिळी ' ह्या अवस्थेच्या ते अधीन होत असतात. आणि पर्यायानें आजची सदोष न्यायपद्धति हीच त्या अन्यायी व्यवस्थेस उत्तेजन देत असते.

### कायदासल्लागारमंडळें हवींत

ह्या अनेक अडचणी लक्षांत घेतल्या म्हणजे वाटतें कीं, कायद्याबद्दलची माहिती देणारें अगर कायदेशीर सल्ला देणारें सल्लागारमंडळ दरेक गांवांत हवें कीं जिथें गोरगरीबांना कायद्याचा स्पष्ट, शक्य तितका थोड्या खर्चांत आणि बिनचूक सल्ला मिळेल. स्त्रियां-पुरतें बोलावयाचें तर आतां दरेक लहानमोठ्या गांवांत स्त्रियांचीं मंडळें, स्त्रियांचे समाज सामाजिक कामें करीत आहेत. स्त्रियांमुलांची वैद्यकीय तपासणी व औषधोपचार करण्याचीं केंद्रेंहि कांहीं गांवांतून अशा मंडळ-समाजांमा-र्फत चालविण्यांत येत आहेत. अशाच समाजांनीं स्त्रियां-करितां ठिकठिकाणीं कायद्याचीं सल्लागारमंडळें चाल-विण्याचें अंगावर घ्यावें. अलीकडे कायद्याच्या परीक्षा झालेल्या विदुषी पुष्कळ असतात. शिवाय दरेक गांवांत सार्वजनिक काम करणारा उत्साही वकील कुणीतरी असतो. तेव्हां सल्ला कोण देईल हा प्रश्न सोडविण्यास अडचण पडणार नाहीं. गरीबांना सल्ला दिला तर तोहि वाया जात नाहीं. ज्याला फुकट मदत वा सल्ला दिलेला असतो असा गरीब माणूस तें कायम स्मरतो आणि इतर पक्षकारांजवळ त्या वकीलाची स्तुति करून त्यांना ओढून आणून उपकाराची सव्याज फेड करीत असतो. तेव्हां वकील-डॉक्टरानें कुणाचें फुकट काम केलें तर तें फुकट जात नाहीं. उलट, तें परिणामीं जास्त फायद्याचें ठरतें. शिवाय परोपकार केल्याचें श्रेय व समाधान मिळवितां येतें तें निराळेच! या कायदेसल्लागारमंडळानें कायद्याबद्दलची माहिती देणारीं व्याख्यानें करावींत, म्हणजे कायद्याची सर्वसाधारण माहिती स्त्रियांना मिळेल आणि अडीअडचणीच्या वेळीं त्या सल्लागारमंडळाकडे सल्ला विचारण्यासाठींच येतील. आरोग्यशास्त्रविषयक व्याख्यानांचा पुष्कळ उपयोग झालेला आज आपण पाहतों. स्त्रिया, मुलें यांना वैद्यकीय सल्ला-उपचार देण्या-साठीं जीं ठिकठिकाणीं केंद्रें चालविण्यांत येत आहेत, त्यांचा जसा फायदा आतां दिसूं लागला आहे, तसाच फायदा या कायदासल्लागारमंडळाचाहि दिसूं लागेल.

याच सल्लागारमंडळानें अनाथ, अज्ञान स्त्रियांना न्याय मिळवून देण्याबद्दल तजवीज करावी. इंग्लंड-अमेरिकेंत गरीब माणसांना कायद्याची मदत करणाऱ्या वकीलांनीं चालविलेल्या संस्था आहेत. त्यांतून गरीबांना फुकट सल्ला देण्यांत येतो. त्यांच्या तर्फे तें कोर्टकचेऱ्यांत कज्जे लढविण्यांत येतात व हरलेल्या प्रतिपक्षाकडून कोर्टखर्च जो नंतर मिळतो तो अशीं मंडळें घेतात आणि कामें करणाऱ्या वकिलांना काम चालविण्याच्या अगोदर नव्हे तर काम फत्ते झाल्यावर भरपूर फीहि मिळते. हीं मंडळें आज स्वयंसिद्ध आहेत. लाखों गोरगरिबांना कायद्याचा सल्ला व मदत देत आहेत, रशियांत तर कायद्याचें रक्षण दरेकास विनामूल्य आपो-आप मिळतें. फक्त त्यानें जाऊन आपलें गाऱ्हाणें न्याया-धीशापुढें नोंदविलें कीं बस. त्याला वकील सरकारांतून मिळतो, पैसे सरकारांतून वसूल करून मिळतात.

अडाणी कायद्यामुळें नव्हे, तर अडाणी सल्ल्यामुळें अज्ञानी, अनाथ, असहाय स्त्रीपुरुषांवर अनर्थ ओढ-वतात. साक्षरतेचा प्रसार झाला म्हणून आपोआप लोक निरोगी होत नाहींत, तर त्यांना आरोग्यशास्त्राचें ज्ञान करून द्यावें लागतें व त्यांच्यासाठीं वैद्यकीय केंद्रें उघडावीं लागतात. तसेंच कायद्याचेंहि आहे. जिथें शिकल्यासवरलेल्या माणसांना कायदा काय हें माहीत नसतें, तिथें नुसतें लिहितांवाचतां येणाऱ्याला कायदा समजेल व तो लक्षांत राहील अशी अपेक्षा करणेंच व्यर्थ. म्हणून गरीबांना कायद्याची सल्लामसलत व मदत देणारीं सल्लागारमंडळें ठिकठिकाणीं उघडलीं तरच कायद्याच्या या युगांत, कायद्याच्या नांवानें होणारा कायदेशीर जोरजुलूम थांबणार आहे. कायदे करून माणसांची नीति जशी सुधारतां येत नाहीं, तसेंच कायदे करून त्यांना रक्षण देतां येत नाहीं. कायद्यानें कोणते हक्क दिले आहेत, त्या हक्कांचें रक्षण कुणाकडून व कसें मिळेल या-विषयीं ज्याल्या वेळीं आणि त्याला हकी-गतीपुरती सल्लामसलत व मदत मिळण्याची कांहीं तरी सोय झाली पाहिजे. आणि ही गरज कायद्याचीं सल्लागारमंडळें भरून काढूं शकतील.







श्री. नारायण य. डोळे

# भारतांतील परकीय वसाहतींचा प्रश्न

## भारताचा अविभाज्य भाग

१९४७ सालीं जेव्हां इंग्रज हिंदुस्थानांतून चालते झाले तेव्हां त्यांच्याबरोबरच, केवळ त्यांच्या सहानुभूती-वर जगणारीं इतर दोन साम्राज्यवादी राष्ट्रें आपले पाय भारतांतून काढते घेतील अशी अपेक्षा होती. परन्तु आज सहा वर्षे झालीं तरी पोर्तुगाल व फ्रान्स आपल्या लहानशा वसाहती ताब्यांत ठेवण्याचा कसोशीनें प्रयत्न करीत असतांना दिसत आहेत. साम्राज्यवाद लवकर नष्ट होत नाहीं असें म्हटलें जातें तें या दोन राष्ट्रांच्या हटवादी धोरणानें सहज सिद्ध होतें. "या परकीय वसाहती एखाद्या सुंदर चेहऱ्यावर असलेल्या पुटकुळयांप्रमाणें आहेत. हा चेहरा सुंदर व निरोगी दिसण्यासाठीं आपणाला या पुटकुळया नाहींशा केल्या पाहिजेत" असें पं. जवाहरलालजींनीं अनेकदां म्हटलें आहे. गेल्या सहा वर्षांत भारत-सरकारनें हा प्रश्न सामोपचारानें सोडविण्याचा प्रयत्न केला; परन्तु या प्रयत्नांना यश आलें नाहीं. नुकतीच पं. नेहरूंनीं या प्रदेशांना 'मन्रो डॉक्टरिन' लावण्याचा आपला विचार असल्याची घोषणा केली. दक्षिण अमेरिकेमध्यें युरोपियन राष्ट्रांनीं ढवळाढवळ केल्यास ज्याप्रमाणें अमेरिका ती चालूं देणार नाहीं, त्याप्रमाणें हिंदुस्थान-मधील या वसाहतींच्या प्रश्नामध्यें परकीयांचा हस्तक्षेप भारताला खपणार नाहीं असें त्यांनीं त्या वेळीं बजावलें.

१९४९ पूर्वी भारतांत आठ वसाहती होत्या. चंद्र-नगर या फ्रेंच वसाहतीनें सार्वमतांत भारतामध्यें सामील होण्याचा निर्णय १९४८ मध्यें घेतल्यानें सध्या भारतांत फ्रेंचांच्या ४ व पोर्तुगीजांच्या ३ अशा सात वसाहती आहेत.[१] १७०० चौ. मैलांचा प्रदेश या वसाहतींनीं व्यापला असून १९४१ च्या शिरगणतीप्रमाणें त्यांची लोकसंख्या सुमारें दहा लाख आहे. हे आंकडे भारता-च्या भूभागाच्या आणि लोकसंख्येच्या तुलनेनें अगदीं किरकोळ व उपेक्षणीय वाटत असले तरी या वसाहतीं-चा प्रश्न हा भारतापुढील अत्यंत महत्त्वाच्या प्रश्नांपैकीं एक आहे यांत शंका नाहीं. सर्व वसाहती समुद्र-किनाऱ्यावर असल्यामुळें लष्करी दृष्टीनें त्या भारताला मोलाच्या वाटतात.

फ्रेंच वसाहती जवळजवळ सर्व बाबतींत भारतावर अवलंबून आहेत. धान्य, कापूस, कोळसा व वीज त्यांना

---

[१]

**भारतांतील परकीय वसाहती**

| अ. नं. | नांव | क्षेत्रफळ | लोकसंख्या * | वसाहत कोणाची | भारतांतील प्रांत |
|---|---|---|---|---|---|
| १ | गोवा | ४१६८ चौ. मैल | ५,४४,४४६ | पोर्तुगीज | मुंबई |
| २ | दीव | १० चौ. मैल | १९,७३१ | ,, | ,, |
| ३ | दमण | ६२ चौ. मैल | ६०,००० | ,, | ,, |
| ४ | माहे | २६ चौ. मैल | १४,०९२ | फ्रेंच | मद्रास |
| ५ | कारिकल | ५३ चौ. मैल | ६०,५५५ | ,, | ,, |
| ६ | पाँडिचरी | ११९ चौ. मैल | २,४२,९३७ | ,, | ,, |
| ७ | यानम | ५ चौ. मैल | ५,७११ | ,, | ,, |

* १९४१ नंतर या परकीय वसाहतींतून शिरगणती झाली नाहीं, त्यामुळें त्यानंतरचे अधिकृत आंकडे उपलब्ध नाहींत.



अनुक्रमणिका

भारतामधून मिळवाव्या लागतात. रेल्वे, पोस्ट व जकात हीं खातीं हिंदसरकारतर्फेच चालविलीं जातात. भारतसरकार या वसाहतींना वर कांहीं खंडणीहि देतें. फ्रेंच वसाहतींच्या वार्षिक अंदाजपत्रकामध्यें दर वर्षी १२ लाख रुपये भारताकडून जमा झालेले असतात. या वसाहतींतील लोकांसाठी पाणीपुरवठाहि भारत-सरकारच करीत असतें.

पोर्तुगीज वसाहतींचीहि जवळ जळळ हीच स्थिति आहे. त्याहि बऱ्याच अंशीं भारतावर अवलंबून आहेत. कांहीं माहितगार लोकांच्या मतें पोर्तुगीज वसाहतींचें आणि विशेषतः गोव्याचें वैशिष्ट्य असें कीं या वसाहती जकात चुकविणाऱ्या गुन्हेगार व्यापाऱ्यांचें, आंतर-राष्ट्रीय लुटारूंचें व हेरांचें माहेरघर आहेत. दर वर्षी गोव्यांतून जकात चुकवून येणाऱ्या मालामुळें हिंदुस्थानचें लाखो रुपयांचें उत्पन्न बुडतें. गोव्यामध्यें वरवर दिसणारें जें ऐश्वर्य आहे त्याचें मूळ या चोरट्या व्यापारांतच आहे. मँगॅनीज व लोखंडाच्या खाणीं गोव्यामध्यें सांपडल्यानें सध्यां पोर्तुगीज सरकारचा बराच फायदा होतो. मँगॅनीज अमेरिकेंत निर्यात केलें जातें व लोखंड जपान व इटाली या देशामध्यें पाठविलें जातें. कांहीं महिन्यांपूर्वीच सरकारी भांडवलावर मँगॅनीजची एक नवी खाण सुरू करण्यांत आली आहे.

या परकीय वसाहतींतील बहुसंख्य लोकांना फ्रेंच किंवा पोर्तुगीज भाषा लिहितांवाचतां येत नाहीं. या वसाहतींशीं संलग्न असलेल्या भारतांतील प्रदेशांत जी भाषा बोलली जाते तीच भाषा या लोकांना येते. त्यांच्या वागण्यांत, कपड्यांत किंवा भाषेंत कोणताहि फरक नाहीं. सांस्कृतिक, भौगोलिक, आर्थिक दृष्ट्या हे लोक पूर्णतया भारतीय आहेत. केवळ एका ऐतिहासिक घटनेमुळें त्यांच्यामध्यें आज एक कृत्रिम भिंत उभी झालेली आहे.

मुंबई व मद्रास सरकारचें दारूबंदी-धोरण व हिंदुस्थानसरकारचें नभोवाणीचें धोरण या दोन्हीं धोरणांच्या अंमलबजावणीला या वसाहतीमुळें फार अडथळा येतो.

### परकीयांचा दुराग्रह व भारताला धोका

फ्रेंच व पोर्तुगीज राज्यकर्त्यांना या वसाहतींचें इतकें महत्त्व कां वाटावें हें एक गूढच आहे. या वसाहती क्षेत्रफळांच्या दृष्टीनें अगदी लहान आहेत. संरक्षणाच्या दृष्टीनें पोर्तुगीज किंवा फ्रेंचांना त्यांचा फारसा उपयोग नाहीं. आर्थिक दृष्ट्याहि या वसाहती त्या सरकारांना फारशा फायदेशीर नाहींत. फ्रेंच वसाहतींचें तर प्रत्येक वर्षी तुटीचेंच अंदाजपत्रक असतें. पोर्तुगीज वसाहतींच्या अंदाजपत्रकांबद्दल अधिकृत व विश्वसनीय अशी माहिती उपलब्ध नाहीं. तरी त्यांची स्थिति फ्रेंच वसाहतींपेक्षां फार वेगळी आहे असें नाहीं. आर्थिक दृष्ट्या तोट्याच्या, लष्करी दृष्टीनें फ्रान्स व पोर्तुगालला विशेष उपयोग नसलेल्या या अतिशय लहान वसाहती ताब्यांत ठेवण्याचा या दोन राष्ट्रांचा हा अट्टहास कां चालला आहे हें ध्यानांत येत नाहीं. याला एकच उत्तर बहुतांशीं योग्य दिसतें व तें म्हणजे त्या राष्ट्रांची आपल्या राष्ट्रीय गौरवाची भावना! १९ व्या शतकांत प्रत्येक पुढारलेल्या राष्ट्राला वसाहती असणें आवश्यक व योग्य समजलें जात असें. अमुक एक राष्ट्र किती प्रबल आहे हें त्याच्या वसाहतींवरून मोजण्यांत येत असें. तेच विचार आज २० व्या शतकांतहि या राज्यकर्त्यांच्या डोक्यांत आहेत व म्हणून ते वसाहती सोडण्यास तयार नाहींत असें म्हणणें भाग पडतें.

या वसाहतींचें भौगोलिक स्थान अतिशय महत्त्वाचें आहे. भारताच्या स्वतंत्र परराष्ट्रीय धोरणास या परकीय वसाहतींमुळें फार मोठा धोका आहे. फ्रान्स व पोर्तुगाल हीं राष्ट्रें उत्तर अटलांटिक ('नाटो') करारांतील सभासद राष्ट्रें आहेत. कम्युनिस्टांशीं संभवनीय असलेल्या भावी युद्धांत त्यांच्या प्रदेशाचा व वसाहतींचा उपयोग व्यक्तिशः व सामुदायिक रीत्या करण्याचा त्यांना हक्क आहे. गोवा हें पूर्वेकडील 'नाटो'चें एक प्रबल केंद्र करण्याचें मध्यंतरी घाटत होतेंच. रशिया व अमेरिका यांच्यांमधील भावी युद्धांत आपण पडूं नये असें भारतसरकारचें धोरण आहे. या धोरणामुळें आपल्या प्रदेशावर एका युध्यमान गटाचे तळ असणें इष्ट होणार नाहीं. पोर्तुगाल व फ्रान्स आपल्या हिंदमधील वसाहती अमेरिकेला तळ म्हणून वापरूं देण्यास बिलकूल कचरणार नाहींत. प्रश्न आहे तो फक्त भारताचा आणि म्हणून या परकीय वसाहतींचा प्रश्न अतिशय महत्त्वाचा व अतिशय बिकट आहे.

### फ्रेंच वसाहती आणि सार्वमत

१९४७ मध्यें या प्रश्नाला फार मोठी चालना मिळाली. ३६ कोटी स्वतंत्र झाल्यानंतर त्याच देशांतील










अनुक्रमणिका

१० लाख लोकांनीं परतंत्र कां रहावें ? शांततेच्या मार्गानें भारताला स्वातंत्र्य प्राप्त झाल्यानें स्वातंत्र्योत्तर प्रश्नहि शांततेच्याच मार्गानें सोडविण्यास भारतीय पुढारी उत्सुक होते. भारतसरकारनें १९४७ नंतर लगेच फ्रेंच सरकारशीं या प्रश्नासंबंधीं चर्चा करण्यास सुरवात केली. फ्रेंच हिंदुस्थानांतील जनता स्वतंत्र होण्यासाठीं अतिशय उत्सुक झाली होती. 'फ्रेंच इंडिया नॅशनल कॉंग्रेस'नें एक ठराव करून फ्रेंचांना चालते होण्याचा आदेश दिला. फ्रेंच इंडिया रिप्रेझेंटेटिव्ह असेंब्लीच्या एका सभासदानें हा ठराव असेंब्लीत मांडला. १९४८ मध्यें माहे या फ्रेंच वसाहतींत स्वातंत्र्याची चळवळ झाली. लोकांनीं रेसिडेंटच्या कचेरीचा ताबा घेतला व रेसिडेंटला व त्याच्या कुटुंबांतील मंडळींना पळवून नेलें. पांडिचरीहून युद्धनौकेंतून सैन्य आणून फ्रेंचांनीं ही चळवळ दडपून टाकली. वसाहतीबाहेरील लोकांनीं ही चळवळ केली असा फ्रेंचांनीं आरोप केला व भारतसरकारनें तो खोटा आहे असें ताबडतोब जाहीर केलें.

१९४८ च्या जूनमध्यें भारत व फ्रान्समध्यें सामीलनाम्याबद्दल एक करार झाला. फ्रेंच राज्यघटनेप्रमाणें अशा तऱ्हेच्या सत्तान्तराकरितां २७ व्या कलमाप्रमाणें तेथें राहणाऱ्या लोकांची संमति लागेल असें फ्रेंचांचे म्हणणें होतें. फ्रेंच सरकारचें हें म्हणणें हिंदनें आनंदानें मान्य केलें. सार्वमतापूर्वीं नव्या निवडणुका होतील असें फ्रेंचांनीं जाहीर केलें. तदनुसार ज्या निवडणुका झाल्या त्या वेळीं मतदानकेन्द्रें गुंडांनीं वेढलीं होतीं, असें डॉ. पी. सुब्बरायन्, डॉ. एन्. व्ही. राजकुमार व एम्. लँगेनी या निरीक्षकांचें मत आहे. १९४९ मध्यें चंद्रनगर या फ्रेंच वसाहतीनें सार्वमतांत भारतामध्यें सामील होण्याचा निर्णय घेतला. फ्रेंचांनीं यापासून धडा घेतला व दडपशाहीला सुरवात केली. भारतांत सामील होण्यास अनुकूल असणाऱ्या अनेक लोकांना तुरुंगांत डांबण्यांत आलें. डिसेंबर १९५१ मध्यें पुन्हां म्युनिसिपल निवडणुका झाल्या. भारतांत सामील होण्याच्या बाजूच्या असलेल्या पक्षांनीं या निवडणुकांवर बहिष्कार घातला होता; त्यामुळें फ्रेंच अंमलाखालीं राहण्याच्या बाजूचे लोक बहुसंख्येनें निवडून आले. अशा परिस्थितींत यापुढें सार्वमत स्वतंत्र व निःपक्षपातीपणें होईल अशी अपेक्षा करणें चुकीचें ठरेल.

पंतप्रधान नेहरूंनीं या प्रश्नांबद्दल आपलें धोरण स्पष्ट केलें आहे. कौन्सिल ऑफ स्टेटस्‌मध्यें एकदां ते म्हणाले कीं, " या परकीय वसाहतींना भारतांत राहण्याचा कांहींहि अधिकार नाहीं. या वसाहतींत सध्या चालू असलेली दडपशाही पाहून तर त्यांचें अस्तित्व भारत कदापिहि सहन करणार नाहीं. या वसाहतींच्या सामीलीकरणासाठीं युद्ध सोडून सर्व मार्ग वापरण्यास आम्हीं मागें पहाणार नाहीं. " भारताचा युद्ध सोडून इतर मार्ग वापरण्याचा आग्रह हा भारताच्या दुर्बलपणाचें लक्षण आहे असेंच फ्रेंचांना कदाचित् वाटत असावें किंवा ' नाटो 'च्या ढालीमागें आपण सुरक्षित आहोंत तेव्हां आपण काय वाटेल तें केलें तरी भारत आपलें कांहींहि करूं शकणार नाहीं असा त्यांचा समज असावा.

## गोव्यांतील दडपशाही

पोर्तुगीजांचें धोरण मात्र फ्रेंचांच्यापेक्षां अगदीं वेगळें आहे. त्यांचें धोरण तीन मुद्द्यांत सांगता येईलः

( १ ) गोवा, दीव, व दमण हें गेलीं ४४३ वर्षें पोर्तुगालचे अविभाज्य भाग आहेत. पोर्तुगालचे प्रदेश कोणत्याहि कारणासाठीं तोडून देण्याची पोर्तुगीज राज्यघटनेमध्यें व्यवस्था नाहीं.

( २ ) पोर्तुगालमधील नागरिकांच्या इतकेच राजकीय हक्क या वसाहतींतील लोकांना आहेत.

( ३ ) या वसाहतीवरील पोर्तुगीज राज्य हें जगाच्या संस्कृतीच्या दृष्टीनें अतिशय उपकारक असें आहे.

या परकीय वसाहतींच्या राजकीय लढ्यामध्यें गोव्याचें स्थान वैशिष्ट्यपूर्ण आहे. गोव्याइतक्या चळवळी इतर कोणत्याच वसाहतीमध्यें झालेल्या नाहींत. दीपाराणाच्या नेतृत्वाखालीं १८५२ सालीं गोव्यामध्यें पहिलें सशस्त्र बंड झालें. १८५२ पासून १९१२–१४ पर्यंत एकूण १३ सशस्त्र उठाव झाले. परन्तु क्षेत्र आकुंचित व शक्ति मर्यादित असल्यामुळें हे उठाव दडपून टाकण्यांत आले. १९१० सालीं पोर्तुगालमध्यें राज्यक्रान्ति झाली व तेथें लोकशाही स्थापन झाली. त्यावेळीं गोव्याला व इतर वसाहतींना थोडेसे स्वायत्तेचे अधिकार देण्यांत आले. १९२६ सालीं दुसरी राज्यक्रान्ति होऊन सालझारची हुकुमशाही सुरूं झाली. १९३७ सालीं गोव्यांतील नागरिकस्वातंत्र्य संपूर्णतया नष्ट झालें. भारतांतील प्रत्येक विचारप्रवाह थोडासा का










असेना पण गोव्यांत वहात जात असे. गांधीजींच्या भारतांतील चळवळीमुळें गोव्यांतील लोकांत थोडी जागृति उत्पन्न झाली. परन्तु तेथें फार मोठ्या प्रमाणांत दडपशाही होत असल्यामुळें जनतेची चळवळ अशी १९४२ च्या अगोदर होऊं शकली नाहीं. १९४२ मध्यें गोव्यांत फार मोठा असंतोष उत्पन्न झाला. भारतांतील ४२ च्या क्रांतिवीरांना आश्रय देणें, मदत करणें एवढेंच प्रत्यक्ष कार्य यांतून उत्पन्न झालें. प्रत्यक्ष स्फोट मात्र झाला नाहीं. लोकांच्या असंतोषाला वाचा फुटण्यास १९४६ साल उजाडावें लागलें. डॉ. राममनोहर लोहियांनीं सभाबंदीचा हुकूम मोडून मडगांवला प्रचंड सभा घेतली व चळवळीला सुरवात झाली. या वेळीं असंख्य तरुण एकत्र आले. लोहियांना अटक करून त्यांना हद्दपार करण्यांत आलें. प्रभातफेऱ्या, सभा, निदर्शनें वगैरे चळवळीचे प्रकार सुरू झाले. सरकारनें अभूतपूर्व अशा दडपशाहीला सुरवात केली. शेकडोंना तुरुंगांत टाकण्यांत आलें. भेंब्रे, हेगडे, काकोडकर, कुन्हा वगैरे पुढाऱ्यांना लष्करी कोर्टानें ८ वर्षांच्या शिक्षा ठोठावल्या. त्यांना आफ्रिकेंतील तुरुंगांत टाकण्यांत आलें. याच सुमारास गांधीजींनीं 'हरिजन' मध्यें लेख लिहून जनतेच्या चळवळीस आपला आशीर्वाद दिला. १९४६ सालीं वर्धा येथें कॉंग्रेस वर्किंग कमिटीनें ठराव करून वसाहतींच्या स्वातंत्र्याला पाठिंबा दिला. पत्रकारपरिषदेमध्यें पं. नेहरूंनीं निःसंदिग्धपणानें लोकांच्या चळवळीला जरूर ती मदत करण्याचें आश्वासन दिलें. परंतु पुढाऱ्यांना फार दीर्घ मुदतीच्या शिक्षा झाल्यानें व शिस्त व मार्गदर्शन ठीक नसल्यानें चळवळ ओसरली. त्यांतील हिरीरी कमी झाली. १९४७ सालीं भारत स्वतंत्र झाल्याबरोबर पुन्हां चळवळ जोमांत सुरू झाली. नॅशनल कॉंग्रेस ( गोवा ) ही संस्था सुरू झाली. या संस्थेतर्फे आंदोलन सुरू झालें. यावेळीं मात्र मयेकर इत्यादि पुढाऱ्यांना १८–२० वर्षांच्या शिक्षा ठोठावण्यांत आल्या. साम्राज्य उलथून टाकण्याचा प्रयत्न केल्याचा त्यांच्यावर आरोप होता. या दुसऱ्या तुकडीला अटक झाल्यानंतर व तिला अंगोल्याच्या तुरुंगांत धाडल्यानंतर चळवळ पूर्णपणें थांबली. बाहेरची मदत नाहीं व गोव्यांत मार्गदर्शन करतील असे पुढारी शिल्लक नाहींत अशा स्थितीमध्यें चळवळ जर ओसरली तर तें क्षम्यच ठरेल. पुढाऱ्यांच्या शिक्षा भोगून संपल्यानंतरसुद्धां त्यांना गोव्यांत येऊं दिलें जात नाहीं व पोर्तुगालमध्येंहि नोकरी दिली जात नाहीं. अशा तऱ्हेनें गोव्यांतील राजकीय चळवळ आज पूर्णपणें थांबली आहे. कांहीं लोकांनीं बाहेरून प्रयत्न चालविले आहेत – परन्तु ते अत्यल्प आहेत.

भारतसरकारनें हा प्रश्न सामोपचारानें सुटावा म्हणून चर्चा करण्यासाठीं लिस्बन येथें वकीलात उघडली. परन्तु पोर्तुगीज-सरकारनें चर्चा करण्याचें नाकारलें. जानेवारी १९५३ मध्यें हिंदनें पोर्तुगीज सरकारच्या हेकट वृत्तीचा निषेध म्हणून लिस्बन येथील आपली वकीलात बंद केली. या निषेधाचा काडीमात्रहि उपयोग झाला नाहीं. या वसाहती म्हणजे भारताचे अविभाज्य असे घटक आहेत असें भारत सरकारचें मत आहे. भारताशींच त्यांचें भवितव्य निगडित असल्यानें कितीहि दडपशाही केली तरी तेथील लोकांची स्वातंत्र्याची भावना उफाळून वर आल्याशिवाय राहणार नाहीं.

## बड्या राष्ट्रांचें धोरण

या प्रश्नाबद्दल बड्या राष्ट्रांचें काय धोरण आहे, तें पहाणें उद्बोधक होईल – 'डेली मेल' या वृत्तपत्रानें १९५१ मध्यें 'वसाहत – विशेषांक' काढून पोर्तुगाल आपल्या वसाहतीमध्यें करीत असलेल्या सांस्कृतिक कार्याची बारेमाप स्तुती केली होती. अमेरिकेंतील अधिकारारूढ पक्षाचें सर्वसाधारण धोरण अगदीं व्यापारी वृत्तीचें आहे. 'भारतानें प्रथम पश्चिमगटांत सामील व्हावें नंतरच अमेरिका पोर्तुगाल व फ्रान्स यांना हा प्रश्न तडजोडीनें सोडविण्याविषयीं विनंति करूं शकेल' असें त्यांचें म्हणणें आहे. पं. नेहरूंचें कोणत्याहि सत्तागटांत सामील न होण्याचें परराष्ट्रीय धोरण आणि त्यांचे नवचीनशी असलेले मित्रत्वाचे संबंध हे अमेरिकेंतील अधिकारावर असलेल्या कांहीं व्यक्तींना धोक्याचे वाटतात. रिपब्लिकन पुढारी जोसेफ मार्टिन हा या प्रश्नाच्या बाबतींत निःसंदिग्धपणें पोर्तुगाल व फ्रान्सच्या बाजूचा आहे. अमेरिकेंतील एक प्रमुख त्रैमासिक 'फॉरिन अफेअर्स' याच्या १९५२ जुलै-ऑगस्टच्या अंकांत एका लेखकानें म्हटलें होतें कीं, भारतानें जर पोर्तुगालच्या वसाहतींवर आक्रमण केलें तर अँग्लो-पोर्तुगाल कराराप्रमाणें इंग्लंडला पोर्तुगालच्या बाजूनें



अनुक्रमणिका






भारताशीं लढावें लागेल. इंग्लंडच्या बरोबर युनोची संघटनाहि पोर्तुगालच्या पाठीशीं उभी राहील. इंग्लंड व अमेरिकेच्या सरकारांनीं अधिकृत रीत्या आपलें धोरण जरी स्पष्ट केलें नसलें, तरी वारा कोणत्या दिशेनें वाहत आहे हें त्या देशांत व्यक्त झालेल्या वरील विचारावरून ध्यानांत येईल.

या प्रश्नाच्या बाबतींत रशिया मात्र अगदीं प्रथमपासून भारताच्या बाजूनें आहे. साम्राज्यवादाची हिंदुस्थानांतील हीं शेवटची चिन्हें शक्य तितक्या लवकर नाहींशीं व्हावीत अशी इच्छा रशियन पुढारी नेहमीं व्यक्त करतात.

भारतांतील परकीय वसाहतींचा हा प्रश्न कसा सुटणार याकडे भारतांतील व त्या वसाहतींतील लोकांचें लक्ष लागलें आहे. हा प्रश्न सुटण्यासाठीं सहा मार्ग दिसतातः ( १ ) वाटाघाटी, ( २ ) सार्वमतानें किंवा सार्वमताशिवाय सत्तान्तर, ( ३ ) आर्थिक नाकेबंदी, ( ४ ) युद्ध, ( ५ ) संयुक्त राष्ट्रसंघाची मदत, ( ६ ) प्रभावी लोकमताची जागृति. युद्ध करणें हा मार्ग अगदीं अयोग्य व घातक आहे. भारताच्या परराष्ट्रीय धोरणाला आधारभूत असलेल्या तत्त्वाच्या तें विरुद्ध होईल. पोर्तुगाल हा युनोचा सभासद नसला तरी नाटोचा संपूर्ण सभासद आहे. फ्रान्स तर युनो व नाटो या दोन्हींचा सभासद आहे. त्यामुळें हिंदनें त्याच्याशीं युद्ध पुकारतांच नाटोच्या पांचव्या कलमाप्रमाणें नाटोमधील सर्व राष्ट्रें व ३९ व्या कलमाप्रमाणें युनो त्या दोन राष्ट्रांच्या मदतीला येईल.

वाटाघाटी करून हा प्रश्न सोडवावा असा भारताचा प्रथमपासून आग्रह होता. परन्तु त्यांत त्यास यश अजून आलें नाहीं. सार्वमत घेऊन या वसाहतींचें भवितव्य ठरवावें असें भारताचें प्रथम कांहीं दिवस म्हणणें होतें. पण नंतर भारतानें, सध्याच्या परिस्थितींत सार्वमत अशक्य आहे तेव्हां सार्वमताशिवाय आम्हांला त्या वसाहती मिळाव्यात, अशी मागणी केली.

भारतावर अवलंबून असलेल्या या वसाहतींना आर्थिक नाकेबंदी करून वठणीवर आणावें असें कांहीं लोक सुचवितात. अशी नाकेबंदी करणें भारताला अगदीं सहज शक्य आहे. माहेमध्यें केवळ जकात-निर्बंध थोडे कडक केल्याबरोबर तेथील सरकारची कशी त्रेधा उडाली हें सुपरिचित आहे. परन्तु आर्थिक नाकेबंदी हा मार्ग जरी सोपा असला तरी त्यांत आपल्याच तथ राहणाऱ्या देशबांधवांचे हाल होणार असें भारतसरकारला वाटतें. त्यामुळें हा उपाय युद्धाइतकाच त्याज्य मानून भारतानें त्याचा उपयोग केलेला नाहीं.

या वसाहतींतील लोकांचे जे पुढारी आहेत त्यांनीं प्रभावी व जागृत लोकमत तयार करण्यासाठीं झटलें पाहिजे. लोकमतांवर ज्यांचा थोडाफार प्रभाव पडतो अशा उच्चशिक्षित व राज्यकारभारांत वाव असलेल्या वर्गाचें मत भारताला प्रतिकूल आहे. या लोकांना परकीय अंमलाखालीं मिळणारे फायदे भारतांत सामील झाल्यानंतर चालू राहणार नाहींत. या लोकांना पोर्तुगीज वा फ्रेंच भाषा येते. त्यांचीं मुलें पोर्तुगाल किंवा फ्रान्समध्यें उच्चशिक्षण घेत असतात व शिक्षण पूर्ण झाल्यानंतर याच वसाहतीमध्यें मोठे अधिकारी होणार असतात. तेव्हां हा वर्ग काळा बाजार करणारे लोक, सोन्याचांदीचा चोरून व्यापार करणारे – या सर्वांचा भारतांत सामील होण्यास सक्त विरोध आहे. बहुसंख्य जनता अशिक्षित, दरिद्री व असंघटित अशी आहे. तिचें काय मत आहे तें तिला व्यक्त करतां येत नाहीं. तेव्हां या लोकांना संघटित करून भारताच्या बाजूनें त्यांचें मत तयार करणें हाच योग्य मार्ग दिसतो.

हा प्रश्न इतका महत्त्वाचा असूनहि भारतानें तो आजपर्यंत युनोमध्यें कां नेला नाहीं असा प्रश्न पडतो. याचीं कारणें दोन आहेत. एक म्हणजे इतर राष्ट्रांचीं काय मतें आहेत तें आपणांस ठाऊक नाहीं त्यामुळें निर्णय विरुद्ध लागल्यास मागाहून पश्चात्ताप करण्याची पाळी येईल. व दुसरें म्हणजे द. आफ्रिका किंवा काश्मीर या प्रश्नाइतकी तीव्र भावनांची पार्श्वभूमि या प्रश्नाला लाभलेली नाहीं.

हा प्रश्न यशस्वी रीत्या सोडविण्यासाठीं अंतर्गत प्रभावी लोकमत तयार करणें व आंतरराष्ट्रीय राजकारणांत भारताच्या बाजूनें इतर राष्ट्रांची मनें वळविणें हेच मार्ग योग्य आहेत.








श्री. ज्ञानेश्वर उद्धव मांढरे

# महात्मा गांधी : कांहीं आठवणी

जानेवारी, १४ इ. स. १९२४ मकरसंक्रांतीच्या दिवशीं सकाळीं नऊच्या सुमारास मी कामानिमित्त बाहेर पडलों असतां वाटेंत ससून–हॉस्पिटलच्या अगदीं जवळ महात्मा गांधीजींचे चिरंजीव श्री. देवदास गांधी मला अकल्पित भेटले. माझी गांधी-टोपी पाहून, मजजवळ येवून देवदास मला म्हणाले : " Well, Brother! can you just help me ? " प्रथम भेटींतच त्यांच्या ह्या बंधुप्रेमानें व मितमधुर वाणीनें मी तत्काळ विरघळून गेलों. मग मी माझें काम सोडून सर्व दिवस त्यांच्या सेवेंत घालविला. आम्ही दोघांनीं परस्परांची विचारपूस करून संपूर्ण माहिती मिळविली. ससून हॉस्पिटलमध्यें महात्मा गांधीजीचें ॲपेन्डिसायूटिसचें ऑपरेशन ता. १२।१।१९२४ रात्रीं झालें. २।३ दिवस त्यांना बोलवत नसल्यामुळें त्यांच्या भेटीस इतर कोणासही जाण्याची सक्त मनाई होती. तरीपण माझ्या विशेष आग्रहास्तव श्री. देवदास यांनीं मला त्याच दिवशीं संध्याकाळीं दुरूनच बापूजींचें दर्शन घडवून दिलें. महात्माजी त्यावेळीं राजकीय कैदी असल्यामुळें सरकारी वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या परवानगीशिवाय इतर कोणासहि जाणें कठीण होतें. परंतु श्री. देवदास यांनीं माझें नांव आपल्या स्वकीयजनांत सांगितलेलें असल्या-मुळें त्या वेळीं महात्माजींच्या सहवासांत सुमारें २१ दिवस राहून त्यांची यथाशक्ति सेवा करण्याचें सद्भाग्य मला केवळ ईश्वरकृपेनें लाभलें ! सतत २१ दिवसांच्या सहवासांत राष्ट्रांतील अनेक थोरमोठे पुढारी पहावयास मिळाले.

रोज मी सकाळीं, दुपारीं व संध्याकाळीं श्री बापूजींच्या भेटीस नियमानें जात असें. ऑपरेशन जीवावरचें झाल्यामुळें त्यांना शारीरिक व मानसिक तीव्र वेदना होत असतांहि, त्यांची मुद्रा सुप्रसन्न दिसत होती. ज्या वेळीं कोणी जवळ बोलणारें नसे, त्या वेळीं अंथरुणावरील तुळशीची माळ हातांत घेऊन बापूजी रामनामाचा जप सतत करीत. प्रकृतीस थोडा आराम दिसतांच मी त्यांच्याशीं थोडा वेळ बोलण्यास सुरवात केली. प्रथम त्यांच्या पायावर मी मस्तक ठेवतांच ते एकदम उद्गारले : " आपल्यासारख्या ब्राह्मणानें मज-सारख्या शूद्राच्या पायावर डोकें ठेवल्यानें मला मानसिक वेदना होऊन त्यायोगें माझा जीव फार घाबरतो ! " हे त्यांचे उद्गार ऐकून मला ज्ञानेश्वरांची ज्ञानी पुरुषाचें वर्णन केलेली ओवी आठवली ती अशी:–"तेथ सत्काराची कें गोठी। कें आदरा देईल भेटी। मरणेंसी साटीं। नमस्कारितां " (श्रीज्ञानेश्वरी, अ. १३. ओवी १९०). मग थोडाच वेळ आमचें बोलणें झालें. " बापूजी, मी जन्मतःच शूद्र व मूढ असल्यामुळें आपल्या पायाजवळ आलों आहे " असें मी म्हणतांच बापूजींनीं उत्तर दिलें : " मी जन्मानें जरी वैश्य असलों तरी शूद्राचा मुख्य जो सेवाधर्म तो मी आजन्म करीत असल्यामुळें मीहि आपल्यासारखा शूद्रच आहे. म्हणून आपल्या दोघांचें गोत्र उत्तम जमलें आहे ! " माझें नांव, गांव, उपजीविकेचें साधन इत्यादि संपूर्ण माहिती सांगितल्यावर त्यांच्या आज्ञेनुसार हॉस्पिटलमध्यें त्यांना मी सार्थ ज्ञानेश्वरी व माझे सद्गुरु गुलाबरावमहाराजकृत ग्रंथांतील कांहीं निवडक भाग रोज वाचून दाखवीत असे. त्यायोगें त्यांचा आनंद शतपट होई ! श्रीगुलाबराव-महाराज यांचें चरित्र थोडक्यांत ऐकण्याची उत्कट इच्छा दर्शविल्यावरून तें चरित्र त्यांना मी थोडक्यांत सांगितलें तें असें :

श्रीसद्गुरु गुलाबरावमहाराज यांचा जन्म मागासलेल्या वऱ्हाडप्रांतांत अमरावतीजवळ लोणी-टाकळी ह्या खेडेगांवीं पाटील-घराण्यांत इ. स. १८८१ सालीं झाला. सुमारें नऊ महिन्याचे असतांना ते दोन्ही डोळ्यांनीं पूर्ण आंधळे झाले. बालपणींच वयाच्या चवथ्या वर्षी मातृवियोग झाला. वयाच्या अकराव्या वर्षी ते विवाहबद्ध झाले. त्यांची पत्नी त्यांच्या वयाच्या २४ व्या वर्षी निवर्तली. त्यांनीं वयाच्या ३४ व्या वर्षी म्हणजे इ. स. १९१५ मध्यें इहलोकींची यात्रा संपविली ! — श्रीज्ञानेश्वरांच्या पुढील दोन ओव्यांत ( श्रीज्ञानेश्वरी








अ. ६ ) " तैसी दशेची वाट न पाहतां । वयसेचिया गांवा न येतां । बाळपणींच सर्वज्ञता । वरी तयातें ॥ ४५३ ॥ तिये सिद्धप्रज्ञेचेनि लाभें । मनाचि सारस्वतें दुभे । मग सकल शास्त्रें स्वयंभें । निघतीं मुखें ॥४५४॥", श्रीगुलाबरावमहाराज यांचें सारसर्वस्व सांठविलें आहे. बालपणापासूनच त्यांची अलौकिक बुद्धिमत्ता व दैवी चमत्कार जगाच्या प्रत्ययास येऊं लागले. जगांतील सर्व भाषेंतील शास्त्रीय व धार्मिकग्रंथांवर त्यांचें विलक्षण प्रभुत्व असें. संस्कृत, मराठी, हिन्दी, गुजराथी, तामील, कर्नाटकी इत्यादि भारतीय तसेच पाश्चिमात्य संस्कृतीचे शेकडों धर्मग्रंथ यांतील कोणतीहि माहिती श्रीगुलाबरावमहाराज हजारों विद्वानांना तोंडानें तर सांगतच पण ती माहिती कोणत्या ग्रंथांत, कोणत्या प्रकरणांत, कोणत्या पानावर आहे हें बिनचूक सांगून त्यांतील गद्यपद्यात्मक वेंचे भराभर तोंडानें म्हणून दाखवीत यामुळें मोठमोठ्या पदवीच्या विद्वानांना त्यांच्यापुढें विनम्रभावानें हारच खावी लागे. त्यांची ग्रंथनिर्मिति तर अलौकिक व अपूर्व आहे.[1]

श्रीगुलाबरावमहाराजांचें वरील चरित्र ऐकून महात्माजी एकदम उद्गारले: "अगदीं हुबेहुब अशाच प्रकारची जन्मांध अलौकिक संतविभूति आमच्या काठेवाडांत जुंझवाडा येथें होऊन गेली. त्यांचें नांव श्रीबेचरानंदस्वामी महाराज व तेच माझ्या मातुःश्रीचे श्रीसद्गुरु होत. त्यांनीं इ. स. १८७९ च्या सुमारास आपल्या वयाच्या ८५ व्या वर्षी समाधि घेतली." नंतर मी त्यांना दुसऱ्या दिवशीं श्रीगुलाबरावमहाराजांच्या चरित्रांतील ( पूर्वखंड, पृ. १२६ ते १३१ ) श्रीगुलाबराव महाराज हेच पूर्वजन्मींचे बेचरानंदस्वामी अशा अर्थाचा भाग वाचून दाखविला. जो भाग मी त्यांना वाचून दाखविला त्याचा सारांश असाः " काठेवाडांत जुंझवाडा गांवीं श्री बळवंतराव पांडुरंग मराठे हे इ. स. १८६४ ते १८६७ पर्यंत पोष्टमास्तर असून ते श्रीबेचरानंदस्वामींचे एकनिष्ठ भक्त होते. पेन्शन घेतल्यावर इ. स. १९०४ सालीं त्यांची व श्रीगुलाबरावमहाराज यांची भेट अमरावतीस अंबेच्या देवळांत पडून एकांतांत पूर्वजन्मसंबंधीं कांहीं खाणाखुणा त्यांनीं पटवून दिल्या." महात्माजी हा भाग ऐकून उद्गारले कीं, " श्रीबेचरानंदस्वामी महाराज हेच श्रीगुलाबरावमहाराज यांच्या रूपानें इ. स. १८८१ सालीं अवतीर्ण झाले ह्याबद्दल माझी पूर्ण खात्री पटली " व डोळ्यांत प्रेमाश्रू आणून त्यांनीं श्रीमहाराजांना विनम्र भावानें मस्तक खालीं लववून वंदन केलें.

त्या वेळच्या सहवासांत महात्माजींना मी जिज्ञासु बुद्धीनें अनेक प्रश्न विचारीत असे व महात्माजी त्यांचीं समर्पक उत्तरें मोजक्या शब्दांत – कधीं इंग्रजींत व कधीं हिन्दींत – देत असत. त्यांचीं मी टिपणें ठेविलीं आहेत त्यावरून त्यांपैकीं कांहीं महत्त्वाचीं प्रश्नोत्तरें पुढें दिलीं आहेत. महात्माजींच्या उत्तरांचा मराठी सारांश मी पुढें दिला आहे. त्यांचीं इंग्रजींतून दिलेलीं कांहीं उत्तरेंहि संगृहीत केलीं आहेत. माझा संत-वाङ्मयाचा विशेष अभ्यास; म्हणून महात्माजींनीं उत्तर देतांच मला संतवाङ्मयांतील कांहीं विचारसदृश वचनें सुचत असत. तीं मी त्यांना म्हणून दाखवून त्यांचा आशय त्यांना सांगत असे. तो ऐकून महात्माजींना विशेष आनंद होत असे. येथें त्यांपकीं कांहीं सदृश संतवचनेंहि मी दिलीं आहेत.

**प्रश्न १** घरदार, उद्योगधंदा सोडून आपल्या सेवेंत राहून देशसेवा करावी असें वाटतें. आपण त्याबद्दल योग्य सल्ला द्याल काय ?

**उत्तरः**– दारैषणा, वित्तैषणा व लोकैषणा ज्याच्या चित्तांत दृढ आहेत, जो एकटाच कुटुंबाचा पोशिंदा आहे पण ज्याला सांपत्तिक परिस्थिति पूर्ण अनुकूल नाहीं, त्यानें घरदार, उद्योगधंदा सोडून देशसेवा करूं म्हणणें शुद्ध अविचारी ढोंग आहे. देशभक्तीचें किंवा ईश्वरभक्तीचें सोंग करून त्या भांडवलावर संसार थाटणें ही अत्यंत शरमेची गोष्ट आहे. उत्कट देशभक्ति किंवा ईश्वरभक्ति म्हणजे सुळावरील पोळी आहे.

[ सदृश संतवचनें :

" भिक्षापात्र अवलंबणें । जळो जिणें लाजिरवाणें ।
ऐसीयासी नारायणें । उपेक्षिजे सर्वथा" –श्रीतुकाराम

१. श्रीगुलाबरावमहाराजांचे पद्यात्मक ग्रंथ– पहिल्या आवृत्तीचे अठरा भाग व दुसऱ्या आवृत्तीचे तेरा भाग छापून प्रसिद्ध झाले आहेत. त्यांचे समग्र ग्रंथ (१) वेदान्तकेसरी श्रीबाबाजीमहाराज पंडित, श्रीज्ञानेश्वरसंस्थान, दहिसाथ, मु. पो. अमरावती, (२) डॉ. बा. ना. पंडित, डायरेक्टर ऑफ इंडिअन लँग्वेजेस, नागपूर, (३) श्री ज्ञा. उ. मांढरे, १२८ रास्ते पेठ, पुणें २ – यांपैकीं कोणाकडेहि मिळूं शकतील.



अनुक्रमणिका

" भक्ति ते कठीण सुळावरील पोळी।
निवडे तो बळी विरळा शूर ॥
जेथें पाहे तेथें देखीचे पर्वत।
पायावीण भिंत तांतडीची ॥ – श्रीतुकाराम ]

**प्रश्न** २ – विश्वधर्मा – ( Universal Religion) –चें सारसर्वस्व आपण थोडक्यांत सांगाल काय ?

**उत्तर** – " I call myself a Sanatani Hindu. It is my firm belief that no one truly knows the religious scriptures who has not attained perfection in divine virtues ". दैवी संपत्तीचे स्वामी होऊन, अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, अपरिग्रह इत्यादि महाव्रतांचें आजन्म कांटेकोर आचरण करून परमेश्वराचें अखंड स्मरण करणें हेंच, माझ्या मतें विश्वधर्माचें थोडक्यांत सारसर्वस्व आहे. व ह्याच साधनानें व्यक्तीची, कुटुंबाची, समाजाची व राष्ट्राची खरी आध्यात्मिक उन्नति होणार आहे.

[ सदृश वचनें :
" अहिंसा सत्यमस्तेयमकामक्रोधलोभता।
भूतप्रियहितेहा च धर्मोऽयं सार्ववर्णिकः ॥
( भागवत एकादशस्कंध १७, २१ ). ]

**प्रश्न** ३ – अहिंसा, सत्य आदि दैवी संपत्तीविषयीं आपण थोडें अधिक स्पष्टीकरण कराल काय ?

**उत्तर** – " Ahimsā has a world of meaning. In its negative form, it requires deliberate self-suffering; while in its positive form it means the largest love and the greatest charity ". दुसऱ्यानें कायावाचामनानें दिलेलें दुःख निमूटपणें शांत चित्तानें सहन करण्यांत मनाची खरी थोरवी आहे. स्वतः दुर्वाक्य न उच्चारतां दुर्जनांचे दुःशब्दांचे बाण सहन करण्यांत खरी मर्दुमकी आहे. परमेश्वरास देखील कांहीं लोक शिव्या देतातच कीं नाहीं ? प्रतिपक्षांस ठोशास ठोसा परत केल्यानें आपण उच्च भूमिकेवरून खालीं घसरतों, अंतःकरणांतील आपल्या क्षुद्र मनोवृत्तींचें जगांत प्रदर्शन होतें, कामक्रोधादि विकार वाढून त्यायोगें आत्मनाश होतो.

[ सदृश वचनें: " आणि जगाचिया सुखोद्देशें। शरीरवाचामानसें। राहटणें तें अहिंसे। रूप जाण "– ( ज्ञानेश्वरी १६. ११४ ). " दुःख नेदूनि सुख देणें। या नांव अहिंसा म्हणणें "– ( श्रीएकनाथी भागवत १७. २३७ ) ]

सत्य म्हणजे परमश्वर व तो सच्चिदानंदस्वरूप आहे. सत्याची उपासना ही परमेश्वराची उपासना आहे. विचार, उच्चार व आचार ह्यांत एकवाक्यता असणें ही सत्याची खरी व्याख्या आहे. सर्व दुर्गुणांचें व सर्व पापांचें मूळ असत्यांत आहे. अहिंसा व सत्य ह्या दोनच महाव्रतांचें आजन्म कांटेकोर आचरण केल्यास चित्त स्थिर व शुद्ध होऊन त्या योगें कट्टर शत्रू हे जिवलग मित्र होतील.

[ सदृश वचनें: " निंदा आणि नरस्तवन। कदा मिथ्या न बोले वचन। वाचा अनसुट धरणें जाण। सत्य संपूर्ण या नांव " – ( श्रीएकनाथ ).
"सत्य तोचि धर्म। असत्य तें कर्म। आणिक नाहीं वर्म। दुजे यांसी " – ( श्रीतुकाराम ).

**प्रश्न** ४ – परमेश्वरभक्ति कशी करावी ?

**उत्तर** – " The highest form of God's worship consists in doing the excellent work of God, by living in obedience to the moral laws and by rendering unselfish service to humanity. "

सत्त्वगुणाचा उत्कर्ष करून व दैवी संपत्तीचे स्वामी होऊन भगवंताचें अखंड स्मरण ठेवणें ही सर्वश्रेष्ठ भक्ति होय. पूर्ण निष्पाप राहून रामनामाचा सतत जप करणें हा परमेश्वरप्राप्तीचा अचूक व बिनतोड राजमार्ग आहे. लहानपणापासून माझ्या आईनें रामनामाचें बाळकडू पाजल्यामुळें रामनामावर माझी नितांत अचल डोळस श्रद्धा आहे. राजकारणाच्या धगधगीच्या मामल्यांत, अत्यंत बिकट प्रसंगीं जेव्हां माझें मन अगदीं गोंधळून जातें, बुद्धि कुंठित होते व मानवी शक्ति हात टेकते, तेव्हां मी एकांतांत बसून एकाग्र चित्तानें व्याकुळ होऊन प्रभु रामरायास शरण जातों. तेव्हां माझा श्रीराम त्या बिकट समस्यांचें आंतून अगदीं अचूक उत्तर व उपाय सुचवीत असतो. आजपर्यंतचा हा नित्याचा अनुभव आहे.








श्री. ल. नी. छापेकर

# माध्यमिक शिक्षणाची पुनर्घटना

सध्यां आपल्या देशांत सुरु असलेल्या माध्यमिक शिक्षणांत अनेक दोष आहेत ही गोष्ट आतां सर्वसंमत झाली आहे. या दोषांची शास्त्रीय पाहाणी करून माध्यमिक शिक्षणाचें ध्येय, त्याचा काल, अभ्यासक्रम, अध्यापन इत्यादींविषयीं सरकारला ( व जनतेलाहि ) मार्गदर्शक होतील अशा शिफारसी करण्याकरितां समित्या नेमल्या गेल्या. मुदलियार समिति ही अशांपैकींच एक होती. या समितीचा अहवाल आतां सर्वांच्या हातीं आला आहे. आजकालच्या माध्यमिक शिक्षणाचे दोष या अहवालांत नेमके दाखविले आहेत. यापूर्वीहि अनेक व्यक्तींनीं, संस्थांनीं व सरकारी समित्यांनीं हे दोष दाखविले होते. पण ते दोष दूर करण्याचें कार्य पूर्वीपेक्षां आज अधिक आपुलकीचें आणि सुलभ झालें आहे.

## आजकालचें सदोष शिक्षण

आजकालच्या माध्यमिक शिक्षणांत, अखिल-भारताच्या दृष्टीनें विचार करतां, मुख्य दोष दिसून येतात ते असेः–( १ ) माध्यमिक शिक्षणाचा काल भारतांतील सर्व प्रांतांत एकच नाहीं. ( २ ) आजचें माध्यमिक शिक्षण मुख्यतः पुस्तकी आहे. ( ३ ) तें जीवनाला धरून नाहीं व मुलांच्या पुढील आयुष्याचा त्यांत फारसा विचार केलेला नाहीं. ( ४ ) या शिक्षणावर विद्यापीठीय शिक्षणाची पडलेली छाप धोक्याची आहे. ( ५ ) तें एकांगी असून मुलांचा सर्वांगीण विकास करण्यास तें तुटपुंजें आहे. ( ६ ) अध्यापनाच्या पद्धती अतिशय तांत्रिक झाल्या आहेत. ( ७ ) वर्गांतील मुलांची संख्या अतिशय वाढल्यामुळें ( – इ. ११ वींत ५५ पर्यंत – ) वैयक्तिक लक्ष कमी दिलें जातें. ( ८ ) परीक्षेचें दडपण आणि आकर्षण इतकें आहे कीं, त्यांतील निर्णयावर शाळेची लायकी ठरूं पहात आहे. याशिवाय त्यामुळें अध्यापनावर, अभ्यासक्रमावर व मुलांच्या स्वाध्यायावर अतिशय वाईट परिणाम झाले आहेत.

या व इतर दोषांचें, चालूं असलेल्या पद्धतींचें, शाळांच्या आजच्या परिस्थितीचें निरीक्षण करून, अनेक तज्ज्ञ व्यक्तींच्या मुलाखती घेऊन मुदलियार-समितीनें शिफारसी केल्या आहेत. माध्यमिक शिक्षणाची पुनर्घटना कशी करावी लागेल व त्यासाठीं या शिफारसींचा मार्गदर्शन म्हणून कसकसा उपयोग होऊं शकेल याचें थोडक्यांत विवेचन येथें करावयाचें ठरविलें आहे.

## पुनर्घटनेंतील प्रमुख गोष्टी

पुनर्घटना म्हणजे डागडुजी नव्हे. पुस्तकी शिक्षण कमी करून हस्तव्यवसायांना शिक्षणांत स्थान दिलें, शारीरिक शिक्षणाचा समावेश अभ्यासक्रमांत केला, कांहीं सांस्कृतिक कार्यक्रमांचा शालेय जीवनांत अंतर्भाव–आणि तोहि पुष्कळवेळां सूचना, परिपत्रें इत्यादींनीं–केला, एकाद-दुसरी परीक्षा कमी केली, विषयांची विविधता ठेवून त्यांत भरपूर विकल्प दिला–म्हणजे पुनर्घटना झाली असेंहि म्हणतां यावयाचें नाहीं. शिक्षण हें नेहमीं सर्वस्पर्शी असतें. स्थल-काल-व्यक्ति या सर्व दृष्टीनींच शिक्षणाची आवश्यकता आहे. प्राथमिक शिक्षण हा साऱ्या शिक्षणाचाच पाया आहे; पण माध्यमिक शिक्षण हा शिक्षणाचा आणि शिक्षित समाजाच्या रचनेचा कणा आहे. पुनर्घटना करतांना ही गोष्ट प्रथम ध्यानीं आली पाहिजे. दुसरी गोष्ट म्हणजे देशांतील व जगांतीलहि बदलती परिस्थिति ध्यानीं घेऊन तीमधील स्थिर मूल्यांचा विचार केला पाहिजे. आवरण कितीहि बदललें तरी मानवी मन अद्याप फारसें बदललें नाहीं. माध्यमिक शिक्षणांत, व्यक्तीच्या मनाला आजचा ' समानते'चा धर्म कळला पाहिजे; स्वतंत्रपणें विचार करून नवनवे विचार प्रत्येक व्यक्तीला स्वीकारतां आले पाहिजेत; मुलांच्या सुप्त शक्ती जागृत होऊन त्यांच्या विकासाला पुरेसा वाव मिळाला पाहिजे; सर्वांना विकासाची समान संधि लाभली पाहिजे. तिसरी गोष्ट म्हणजे माध्यमिक शिक्षण संपल्यावर प्रत्येक व्यक्ति आपली ' उपजीविका ' योग्य प्रकारें मिळवूं शकली पाहिजे. व्यक्तित्वाचा विकास



अनुक्रमणिका






समाजांतच होतो. आजच्या लोकशाहीच्या युगांत आणि आदर्श लोकशाहींतहि प्रत्येक व्यक्तीच्या अंगीं सामाजिकता, समाजाचा घटक असल्याची जाणीव असली पाहिजे.

प्रत्यक्ष निरीक्षण, चिंतन आणि प्रयोग यानंतर जीं उद्दिष्टें निश्चित झालीं असतील व होतील तीं डोळ्यांपुढें ठेवून पुनर्घटना झाली पाहिजे. मुदलियार-समितीनें माध्यमिक शिक्षणाचें ध्येय याच प्रकारांनीं निश्चित केलें आहे. आजच्या दोषांची छाननी करून, माध्यमिक शिक्षणाबद्दल पालक, शिक्षक, विद्यार्थी यांचे असलेले गैरसमज समितीनें असंदिग्ध स्वरूपांत मांडले आहेत. पुनर्घटना हें देखील एक शास्त्र आहे. आजची स्थिति, साधावयाचें ध्येय, त्यासाठीं आवश्यक तीं साधनें व करावयाची रचना व योजना या चार गोष्टींनीं पुनर्घटनेचें शास्त्र मर्यादित केलें आहे. आजच्या स्थितीची कल्पना – सर्वसामान्य माणसापासून तों विचारवंतांपर्यंत– सर्वांना झाली आहे असें आपण धरून चालूं; कारण आपण ती प्रत्यक्ष अनुभवीत आहोंत. विचारवंतांच्या मतें आजच्या स्थितींत मुख्यतः समाजहिताच्या व समाजाच्या रचनेच्या दृष्टीनें जे दोष दिसतात ते असे :

खेड्यांतील व्यक्तींची धाव शहराकडे फार मोठ्या प्रमाणांत आहे. खेड्यांतील व्यक्ति शिकून तयार झाली कीं ती तेथें राहूं इच्छित नाहीं किंवा त्या व्यक्तीला तेथें आपल्या विकासाला पूर्ण वाव लाभूं शकत नाहीं.

सर्व प्रकारच्या मुलग्यांना ( आणि मुलींनाहि ) एकाच सांच्याचें शिक्षण दिलें गेल्यामुळें सर्वांना उपजीविकेचीं साधनें उपलब्ध नाहींत.

विज्ञानामुळें उपलब्ध झालेलें सामर्थ्य संयमानें कसें, कोठें, किती वापरावयाचें याचें सम्यक् ज्ञान झालेलें दिसत नाहीं.

ज्ञानाचा विस्तार खूप झालेला दिसतो पण त्याला खोली कमी आहे.

जीवनाबद्दलची आस्था वाटून त्यांतला सात्त्विक आनंद लुटतां यावा म्हणून आवश्यक असलेल्या स्वाध्यायाची कमतरता आहे.

यांतील कांहीं गोष्टींची मुदलियार समितीनें आपल्या अहवालांत चर्चा केली आहे; पण या सर्वच बाबींचा विचार करणें आवश्यक होतें. रोगाचें अचूक निदान झाल्याशिवाय त्यावर औषधयोजना नेमकी करणें कठीण आहे. शिक्षणशास्त्र व अध्यापनकला यांचा संबंध हरघडी व्यक्तिमन व सामाजिक मन यांच्याशीं विविध क्षेत्रांतूनहि येत असतो. आणि म्हणून खेड्यांची पुनर्रचना, देशांतील विविध प्रकारच्या विकासयोजना, कलाविषयक व इतर सांस्कृतिक हालचाली यांच्याशीं शैक्षणिक पुनर्घटनेचाहि अतिशय निकटचा संबंध राखला पाहिजे. समितीनें म्हटल्याप्रमाणें जीवनाचें शिक्षण ('Education for living') द्यावयाचें असेल तर समाजांतील विविधतेंतहि एकता साधण्याचें कौशल्य व्यक्तीला प्राप्त झालें पाहिजे. अतिशय आवश्यक असें प्राथमिक ज्ञान प्राप्त झाल्यानंतर मुलांपुढें शिक्षणाच्या विविध शाखा खुल्या असल्या पाहिजेत. पण एवढ्यानेंच भागणार नाहीं. सरकारनें त्यासाठीं नियोजनहि राखलें पाहिजे. मुलांचें बुद्धिमापन शक्य तों बरोबर होऊन त्यांना व्यावसायिक मार्गदर्शनहि झालें पाहिजे. केवळ नोकरी हें ध्येय मुलांनीं ठेवूं नये हें खरें. पण त्यांच्यापुढें उपजीविकेसाठीं आवडीचे असे अनेक मार्ग नसले तर तीं मुलें तरी दुसरें काय करणार ?

थोडक्यांत सांगावयाचें हें कीं, आपल्या देशाचा विकास कोणत्या मार्गांनीं कसकसा होणार आहे याचा आराखडा डोळ्यांपुढें ठेवून माध्यमिक शिक्षणाची पुनर्घटना करणें जरूर आहे. निरनिराळ्या क्षेत्रांत येत्या १०–१५ वर्षांच्या काळांत किती माणसें लागतील हें ठरवून मुलांच्या नैसर्गिक आवडीनुसार त्यांना मार्गदर्शन करणें अत्यंत जरूर आहे. ग्रामपंचायतींचा, नगरपालिकांचा व इतर सरकारी वा बिनसरकारी खात्यांचा कारभारहि समोर ठेवला पाहिजे. या कार्यासाठीं लागणाऱ्या गुणांचें बीजारोपण व थोडा प्राथमिक विकासहि माध्यमिक शिक्षणाच्या क्षेत्रांतच करावयाचा असतो.

### भाषेचें अध्ययन

माध्यमिक शिक्षणासाठीं लागणारा काळ भारतांतील सर्व प्रांतांत एकच असावा – वय ११ ते १७ वा १८– अशी समितीची शिफारस आहे. त्यांत पूर्व-माध्यमिक व उत्तर-माध्यमिक असे दोन भाग सुचविले आहेत. ही सूचना स्वागतार्ह आहे. वैकल्पिक व विशेष अभ्यासाचे विषय उत्तर-माध्यमिक शाळेंतील दुसऱ्या वर्षांत (–या वेळीं मुलाचें वय १५ असेल–) सुरु व्हावेत. ही सूचनाहि शास्त्रशुद्ध आहे. या योजनेमुळें








मुलांना पुरेसें प्राथमिक शिक्षण मिळेल व पूर्व-माध्यमिक संपल्यावर त्याला उच्च शिक्षणासाठीं जावयाचें नसेल तर व्यावसायिक शिक्षण घेऊन तो आपल्या जीवनाला पोषक अशी तयारी करूं शकेल.

पूर्व-माध्यमिक शिक्षणाचा अभ्यासक्रम ठरवितांना मात्र भाषाविषयक प्रश्नाबाबत समितीनें योग्य मार्गदर्शन केलें आहे असें वाटत नाहीं. या अवस्थेंत मुलाला तीन भाषांचा अभ्यास करावा लागणार आहे— प्रादेशिक भाषा, संघराज्यभाषा व इंग्रजी. इंग्रजी भाषा सक्तीची नसेल. आजहि मुंबई राज्यांत ही स्थिति आहे व त्यामुळें लहान लहान शाळांत इ. ८ वींत दोन्हीं प्रकारच्या मुलांचा — इ. ७ वींत इंग्रजीं शिकलेलीं व न शिकलेलीं अशा दोहोंचाहि — भरणा असतो. आर्थिक दृष्ट्या दोन वर्ग ठेवणें शाळांना परवडत नाहीं व वर्गांत एक प्रकारचा गोंधळच निर्माण होतो.

नव्या योजनेंत समितीनें आणखी एक सूचना केली आहे : जीं मुलें इंग्रजी घेणार नाहींत त्यांच्यासाठीं आणखी एकाद्या भाषेच्या शिक्षणाची सोय शाळांनीं करावी किंवा प्रादेशिक भाषांचा अधिक अभ्यास ठेवावा. म्हणजे आणखी एकाद्या वर्गाची भर पडेल. इंग्रजी व भारताची राज्यभाषा या दोन भाषांमुळें आपल्या अभ्यासक्रमाला एक प्रकारें जखडून टाकलें आहे. इंग्रजी व संघराज्यभाषा नसावी असें कोणीहि म्हणणार नाहीं. पण त्या अगदीं याच अवस्थेंत असाव्या असा आग्रह धरणें अनेक दृष्टींनीं धोक्याचें आहे. भाषेच्या अध्ययनाबद्दल कांहीं मूलभूत गोष्टी प्रथम ध्यानीं घेणें फार आवश्यक आहे. त्या अशा :

( १ ) प्राथमिक, पूर्व-माध्यमिक या अवस्थांत मुलाला मातृभाषेंत शुद्ध बोलतां व लिहितां आलें पाहिजे. चांगलें काव्य व चांगलें गद्य यांचें समजून-उमजून पाठांतर झालेलें असलें पाहिजे. व्याकरणाचीं कांहीं मूलभूत तत्त्वें त्याला सरावानें समजलेलीं असलीं पाहिजेत.

( २ ) मातृभाषेची चांगली समज — बोलणें, वाचणें, लिहिणें इत्यादि — आल्यास दुसरी भाषा शिकणें अवघड वाटत नाहीं.

( ३ ) भाषा म्हणजे विचार व आचार समजण्याचें व समजावून सांगण्याचें प्रत्येकाजवळ सहज उपलब्ध होणारें साधन आहे.

या तीन गोष्टींचा विचार केला तर मला वाटतें कीं, मातृभाषेचा सखोल अभ्यास व संघराज्यभाषेचा प्राथमिक अभ्यास — असा अभ्यासक्रम ठेवायला हरकत येणार नाहीं. मुलाचें वय १४ झाल्यावर तो उत्तर-माध्यमिक शाळेंत जाईल. तेथील चार वर्षांच्या कालांत त्याला इंग्रजी भाषा शिकवावी. समितीनें असें सुचविलें आहे कीं, या अवस्थेंत प्रत्येक मुलानें कमींतकमी दोन भाषांचा अभ्यास केला पाहिजे. ही सूचना चांगली आहे, पण समितीनें ( पानें ८६।८७ ) सुचविलेले विकल्पहि अभ्यासूंनीं जरूर पहावेत. शिवाय 'संघराज्य-भाषा हिंदी' व 'प्रादेशिक हिंदी' यांतील अंतर स्पष्ट केल्याचेंहि कोठें आढळत नाहीं.

अध्ययन-अध्यापनाचें माध्यम मातृभाषाच असावें याबाबत आतां समितीशीं कोणाचा विरोध होणार नाहीं आणि झालाच तरी तो विचारांत घेण्याची तितकी आवश्यकताहि नाहीं.

## क्रियाशीलतेची जोड

माध्यमिक शिक्षणांतील 'पुस्तकी' अभ्यासाबरोबरच व्यावसायिक अभ्यासाला समितीनें योग्य स्थान दिलें आहे. उत्तर-माध्यमिक (Higher Secondary) अवस्थेंत अभ्यासक्रमाची विविधता भरपूर आणून ती विद्यापीठीय शिक्षणाशीं जुळती ठेवली आहे. कांहीं विषय सर्वांनाच आवश्यक ठेवले आहेत, ही गोष्ट पण मुलांची सर्वसामान्य तयारी होण्यास उपयुक्त ठरेल. वैकल्पिक अभ्यासक्रमासाठीं तीन वर्षें दिलीं आहेत आणि पुरेसें साहित्य, प्रात्यक्षिक कार्य व योग्य मार्गदर्शन हीं लाभल्यास मुलांची तयारी चांगली होऊं शकेल.

खेड्यांत वा शहरांत राहून, नोकरी करून वा स्वतंत्र व्यवसाय करून, लोकसेवेचें प्रत्यक्ष कार्य करून वा त्यासाठीं सुबुद्ध सहकार्यमय नागरिक जीवन जगून, व्यक्तीला आपली उपजीविका करावी लागेल याची प्रत्यक्ष चर्चा जरी या अहवालांत केलेली नसली तरी समितीनें सुचविलेल्या अभ्यासक्रमांतून या गोष्टींचें दर्शन झाल्याशिवाय राहात नाहीं. सुचविलेला अभ्यासक्रम मुलांच्या विविध शक्तींना आणि आवडींना आवाहन करणारा आहे. अभ्यासक्रमांतील विषयांचा विस्तार किती व कसकसा असेल याचें त्रोटक विवेचन समितीनें केलें आहे.








## उत्तम अध्यापक हवेत

मुलें शाळेंत आलीं, त्यांच्यासाठीं अभ्यासक्रम तयार झाले, त्यासाठीं आवश्यक तें साहित्यहि उपलब्ध झालें म्हणजे मुलांचें शिक्षण चांगल्या प्रकारचें होईलच असें नाहीं. त्यासाठीं प्रगतिपर अशा अध्यापनाची–मार्गदर्शनाची–आवश्यकता केव्हांहि असणारच. चांगला अध्यापक सामान्य अभ्यासक्रमांतूनहि आपल्या विद्यार्थ्यांना उत्तम मार्गदर्शन करील. याउलट सामान्य वा निकृष्ट अध्यापक उत्तम अभ्यासक्रम असूनहि मुलांना योग्य मार्गदर्शन करूं शकणार नाहीं. या गोष्टींची समितीला जाणीव आहे. समितीनें या दृष्टीनें विस्तृत चर्चा करून अध्यापक कसे तयार करून घ्यावेत याबद्दल मूलग्राही आणि महत्त्वपूर्ण सूचना केल्या आहेत. मुलांच्या सर्वांगीण विकासाच्या दृष्टीनें त्या सूचना प्रथम अंमलांत आणणें अत्यंत आवश्यक आहे. अध्यापकांचे पगार वगैरेबाबत विचार करण्याचें व धोरण ठरविण्याचें कार्य त्यांनीं प्रांतिक सरकारवर सोंपविलें आहे.

आजच्या अध्यापनपद्धती किती सदोष आहेत हें दाखवून समितीनें शिक्षकांच्या व्यावसायिक शिक्षणाच्या (training of teachers च्या) दृष्टीनें अनेक उपयुक्त सूचना केल्या आहेत. समितीचा अहवाल मला या दृष्टीनें फार मौलिक वाटतो. समाजांतील सत्प्रवृत्त, संयमी व्यक्तींनीं शिक्षणाचें कार्य अंगावर घेतल्याशिवाय – आणि तेंहि स्वयंप्रेरणेनें आणि ध्येयनिष्ठेनें – भारताच्या शिक्षणाचा दर्जा वर जाणें कठीण आहे. कोणत्याहि शिक्षण-पद्धतींत ही गोष्ट अतिशय महत्त्वाची आहे. शिक्षकाचें जीवन हें आदर्श होण्यासाठीं ज्या ज्या गोष्टींची आवश्यकता आहे त्यांचाहि विचार समितीनें केला आहे. शिक्षकांची आर्थिक स्थिति, त्यांच्या पुढील शिक्षणाची व्यवस्था, त्यांच्यावरील कौटुंबिक जबाबदाऱ्या, त्यांचे प्रवास, त्यांचें आरोग्य इत्यादि अनेक प्रश्नांचा समितीनें विचार केला आहे. आजच्या परीक्षा-पद्धतींत सुधारणा झाल्याशिवाय अध्यापनाच्या पद्धतींत बदल होणें कठीण आहे याचीहि जाणीव समितीला आहे. अहवालांतील बारावें प्रकरण म्हणजे या अहवालाचा महत्त्वाचा भाग आहे. त्यांतील बऱ्याचशा सूचना प्रत्यक्ष अंमलांत आणल्याशिवाय आपल्या माध्यमिक शिक्षणाची पुनर्घटना करूं पाहाणें अज्ञानमयच ठरेल.

प्रत्येक शिक्षकानें अवश्य वाचावें व आपल्या दैनंदिन जीवनांत तें अधिकाधिक उतरविण्याचा कसोशीनें प्रयत्न करावा असें या अहवालांतलें प्रकरण म्हणजे अध्यापन-पद्धतीसंबंधींचें सातवें प्रकरण होय. साध्य आणि साधनें यांचा कसा मेळ घातला पाहिजे याचें मार्गदर्शन या प्रकरणांत आढळतें. मुलांची विचारशक्ति जागृत करून ती भारताच्या लोकशाहीला पोषक होईल असें मार्गदर्शन अध्यापकांकडून विविध प्रकारें झालें पाहिजे. हातीं घेतलेल्या उपयुक्त कार्याबद्दल आस्था वाटून मुलांनीं आपलें सर्व सामर्थ्य एकवटून त्या कार्यासाठीं झटलें पाहिजे. वैयक्तिक आणि सामूहिक कार्याच्या मर्यादा जाणून सर्वांनीं ध्येयसिद्धीसाठीं कसें धडपडायला हवें याची जाणीव मुलांना माध्यमिक शिक्षणाच्या अवस्थेंत करून दिली पाहिजे. ग्रंथालयें, वस्तुसंग्रहालयें यांचें शैक्षणिक महत्त्व प्रत्येक अध्यापकाच्या ध्यानीं चांगलें आलें पाहिजे.

## सरकार व जनता यांची कसोटी

एकंदरींत हा मुदलिआर-समितीचा अहवाल पुनर्घटनेच्या दृष्टीनें पुष्कळच चांगला आहे. अभ्यासक्रमांतील भाषांचा अभ्यास कमी करणें, जीवनाला आवश्यक अशा विषयांचा अभ्यासक्रमांत समावेश करणें, प्रात्यक्षिकांवर अधिक भर देणें, उत्तम अध्यापक मिळतील अशी व्यवस्था करणें, आजची परीक्षा-पद्धति बदलून मूल्यमापनाच्या प्रगतिपर अशा चांचण्यांची योजना करणें, विविध प्रकारच्या शाळांची योजना करणें, मुलांच्या शीलसंवर्धनासाठीं पुरेसा वाव ठेवणें इत्यादि अनेक दृष्टींनीं हा अहवाल महत्त्वपूर्ण मार्गदर्शन करील असें वाटतें.

पण अहवाल लिहिले जातात, चर्चिले जातात व दप्तरांत बांधून ठेवले जातात. पुढील अहवाल लिहितांनाच या अहवालाचा संपूर्ण उपयोग केला जातो! अहवालांतील मूलग्राही शिफारसींना शक्य तितक्या लवकर प्रत्यक्षांत उतरविण्यांतच सरकार व जनता यांची खरी कसोटी असते. आतां आपलें राज्ययंत्र आपल्या हातांत आहे. यावेळीं उगाच दीर्घसूत्रीपणा उपयोगी नाहीं.

अहवालांतील कांहीं गोष्टी अशा आहेत कीं, त्याबद्दल मतभेद होऊं शकतील त्या अशा :










अनुक्रमणिका

१ क्रमिक पुस्तकांसाठीं समितीनें सुचविलें आहे कीं यासाठीं उच्चाधिकारसमिति असावी. त्यांतील सदस्यांची कोणती लायकी असावी हेंहि समितीनें स्पष्टपणें नमूद केलें आहे. त्यामुळें कदाचित् आजची लांचलुचपत कमी होईल. पण त्यामुळें उत्तम क्रमिक पुस्तकें तयार होतील असें नाहीं.

२ माध्यमिक शिक्षणाचा प्रश्न हा खाजगी संस्थांचा प्रश्न आहे. मुंबई राज्यांत तरी हा प्रश्न बराचसा तसाच आहे. या संस्थांचें व त्यांत कार्य करणाऱ्या बऱ्याचशा शिक्षकांचें स्थान समितीनें चांगल्या प्रकारें निश्चित केलें नाहीं. आजच्या तपासणीच्या पद्धती, शाळेंत येणारे अननुभवी तपासनीस, सरकारनें शें. २५ ते ३० आर्थिक मदत देऊनहि संस्थांवर ठेवलेला ताबा, या संस्थांची आर्थिक स्थिति सुधारण्यासाठीं व त्या सर्व दृष्टींनीं कार्यक्षम करण्याच्या दृष्टीनें करावयाच्या योजना इत्यादि महत्त्वाच्या गोष्टींचा व्हावा तसा विचार या अहवालांत झालेला दिसत नाहीं.

३ भारताचा नियोजित विकास, ग्रामीण उद्योग, राष्ट्रीकरण व्हावयाचे उद्योगधंदे, सहकारी स्वरूपाच्या संस्था, सरकारी खातीं व राज्यकारभारविषयक संस्थांचें व सत्तेचें विकेंद्रीकरण यांचा विचार करणेंहि जरूर होतें. या सर्व संस्थांतून कार्य करायला लागणाऱ्या व्यक्ती किती असाव्यात ? केव्हां केव्हां उपलब्ध व्हाव्यात ? कसकशा तयार व्हाव्यात ?— या गोष्टींचा नियोजनाशीं संबंध आहे. आणि त्यांचा परिणाम माध्यमिक शिक्षणावर होणें अपरिहार्य आहे.

या उणीवा असल्या तरीहि हा अहवाल पुष्कळसा प्रगतिपर असून सरकारला व जनतेला आजच्या घटकेला योग्य मार्गदर्शन करणारा आहे. त्याकडे विचारवंत, शिक्षणतज्ज्ञ व सरकार यांचें जितकें लवकर लक्ष जाईल तितकें चांगलें. माध्यमिक शिक्षणाची पुनर्घटना करतांना प्रत्येक प्रांतानें या अहवालास धरून सहकार्य केलें पाहिजे आणि भारतीय शिक्षणखात्यानें ( मूलोद्योगी शिक्षण धरून ), प्राथमिक शिक्षण, माध्यमिक शिक्षण व त्यानंतरचें विद्यापीठीय व व्यावसायिक शिक्षण यांबाबत भारताच्या विकासाचें ध्येय डोळ्यांपुढें ठेवून विविधतेंतहि एकत्व साधण्याचे मार्ग समोर ठेवून अचूक मार्गदर्शन केलें पाहिजे. हें घडो आणि भारतीय माध्यमिक शिक्षण सुधारून एकूण शिक्षणाचा आणि समाजरचनेचा कणा निर्दोष होवो.

## लुई पाश्चर यांचा जीवनमंत्र

**आचार्य विनोबा** भूदानाकरितां पदयात्रा करीत असतांना त्यांना अनेक लोक भेटायला येतात व कोणी कांहीं भेट देऊन जातात. असेंच एकदां क्षयरोग-निवारणकेंद्रांत कार्य करणाऱ्या एका युरोपियन सद्गृहस्थानें नुकतेंच त्यांना एक छापील कार्ड भेट दिलें. त्या कार्डावर **लुई पाश्चर** या फ्रेंच वैज्ञानिकाचें एक वचन छापलेलें होतें. त्या वचनाचा अर्थ असा : " तुमचें तत्त्वज्ञान किंवा विचार काय आहेत अथवा तुमचा धर्म कोणता आहे हें मी नाहीं तुम्हांला विचारणार ! पण माझी मात्र एवढी जाणायची इच्छा आहे कीं तुम्हांला दुःख कोणतें व कसलें आहे ? "

ही हकीकत सांगून नंतर त्यासंबंधीं विनोबा म्हणतात : " पाश्चर हे १८९५ सालीं मृत्यु पावले. त्याच सालचा माझा जन्म म्हणून हें वर्ष माझ्या ध्यानांत सहज राहिलें आहे. या गोष्टीला सुमारें ६० वर्षें होतील. या अवधींत पाश्चात्य देशांतील कोट्यवधि रोग्यांच्या तोंडीं पाश्चरचें नांव रामनामाप्रमाणें जाऊन बसलें आहे. देशोदेशीं पाश्चर-संस्था स्थापन झाल्या असून ' पाश्चरीकरण ' हा नवीन शब्द सर्वत्र भाषांमध्यें रूढ झाला आहे. पाश्चरनें एवढें मोठें काम केलें पण तो निरहंकारतेचा पुतळा होता. मी तर त्याला विज्ञानयुगांतील एक महान् संत मानतों. फ्रान्समध्यें सर्वश्रेष्ठ तीन महापुरुष कोण होऊन गेले असें फ्रेंच जनतेला एकदां विचारलें असतां, सर्वांत अधिक मतें वैज्ञानिक पाश्चरला पडलीं, त्याच्या खालोखाल साहित्यिक व्हिक्टर ह्यूगोला व त्यानंतर वीर नेपोलिअनला पडलीं. —आपली विचारधारा किंवा आपली धर्मकल्पना लोकांवर लादण्याची पुष्कळांना हौस असते. परंतु हा फुकट उपद्व्याप आहे असें पाश्चर वरील वचनांत सांगतो. विचारदाता किंवा धर्मशास्ता परमेश्वर आहे. त्यालाच तें काम करूं द्यावें. आपण आपलें दुःखितांचें दुःख दूर करण्याच्या कामास लागावें. दुःखी लोकांची सेवा हाच महान् सद्विचार आहे, तोच महान् सद्धर्म आहे.

" पाश्चरचें वरील वचन असलेलें कार्ड मी माझ्या उपनिषदांच्या पुस्तकांत ठेवून दिलें आहे. "

—' **सर्वोदय** ' ( नोव्हेंबर १९५३ ) वरून









डॉ. चं. रा. तळपदे व श्री. का. झि. पाटील

# सल्फा औषधें संशोधन, निर्मिति व उपयोग

प्रत्येक डॉक्टर अलीकडे सल्फा औषधें उपयोगांत आणतात. प्रत्येक दवाखान्यांत तें महत्त्वाचें औषध होऊन बसलें आहे. याचें कारण म्हणजे सल्फा औषधांचा विविध रोगांवर होणारा उपयोग. बऱ्याच रोग्यांना तें उपयुक्त व स्वस्त असते. म्हणून बहुतेक देशांत सल्फा औषधें तयार करण्याचे कारखाने आहेत. आपल्या देशांत गुजराथेंत बलसाड जिल्ह्यांतील पारनेर गांवीं 'अतुल प्रॉडक्टस्' नांवाचा असा एक मोठा कारखाना सुरू झाला आहे. येथें अझो रंग, सल्फा थायाझोल, फॉलीक ॲसिड व ऑरियोमायसिन तयार होत आहेत. पुण्याला सुरू होणाऱ्या पेनिसिलीनच्या कारखान्याइतकेंच या कारखान्याला महत्त्व आहे.

अमेरिकेंत १९३७ पासून सल्फा औषधें तयार करण्याचे कारखाने सुरू झाले आहेत. १९४३ मध्यें सुमारें एक कोटी रत्तल सल्फा औषधें तयार झालीं होती. त्यामुळें प्रत्येक माणसाला पस्तीस ग्रॅमच्या हिशेबानें तेरा कोटी रोग्यांना संपूर्ण गुण येण्याची शक्यता निर्माण झाली. अशा प्रकारें युद्धाच्या काळीं हजारों रोग्यांवर गुणकारी ठरलेलीं हीं औषधें हल्लीं खूपच प्रसृत झालेलीं आहेत. प्रत्येक सुधारलेल्या देशांत त्यांची प्रचंड निर्मिति होत आहे. विविध रोगांवर उपयोगी ठरलेलें हें औषध आहे तरी काय हें जाणून घेण्याची त्यामुळें प्रत्येकाला उत्सुकता निर्माण झाली आहे.

१९३३ मध्यें प्रथमच एक प्रांगारिक पदार्थ जंतुनाशक दिसून आला : तो म्हणजे सल्फानिलामाईडपासून केलेला रंग होय. वास्तविक सल्फानिलामाईड हा पदार्थ १९०८ मध्यें प्रथम प्रयोगशाळेंत तयार झाला. परंतु त्यांत जंतुनाशक शक्ति आहे ह्याची कोणाला कल्पनाहि नव्हती. त्यावेळीं साधनेंहि उपलब्ध नव्हतीं; म्हणून सल्फानिलामाईड हें नांव पंचवीस वर्षें तसेंच पुस्तकांत पडून राहिलें. इतर हजारों प्रांगारिक पदार्थ तयार होतात, त्यांतलाच तो एक समजला गेला. प्रोन्टोसिल हा सल्फानिलामाईडपासून केलेला अझो रंग रोगजंतूंवर हल्ला करतो, ही गोष्ट १९३३ मध्यें लक्षांत आली. अर्थात् पहिले प्रयोग उंदरावर झाले, नंतर त्याचे प्रयोग माणसांवर यशस्वी झाले.

माणसाला झालेल्या रोगांवर कांहीं विशिष्ट रसायनांचा उपयोग केला तर ते रोग बरे होतात ही कल्पना जुनीच आहे. परंतु जुन्या काळीं या कल्पनेला शास्त्रशुद्ध असें प्रायोगिक यश आलें नव्हते. सुमारें पंधराशेंच्या सुमारांस कॉर्पेन्सिस्नें पाऱ्याचा उपयोग गरमीसारख्या रोगांवर केला. क्विनिनचा हिंवतापावर उपयोग करणें सतराव्या शतकांत सुरू झालें. मात्र या शतकाच्या सुरवातीलाच रासायनिक वैद्यका – ( chemo-therapy ) ला खरी सुरवात झाली असें म्हणतां येईल. रासायनिक पदार्थांच्या साहाय्यानें रोगांचें निवारण करण्याचें एक शास्त्रच बनत आलें. त्या शास्त्राला १९१० पासून अर्लिश (Erlich) या जर्मन संशोधकानें सुरवात केली. गरमीसारखा रोग असाध्य मानला जात होता. परंतु तो निवारण्यासाठीं सल्व्हारसन् नांवाच्या रासायनिक पदार्थाचा उपयोग दिसून आला. अशा प्रकारें गेल्या चाळीस वर्षांत बरेच रासायनिक पदार्थ औषधाकरितां म्हणून वापरतां येऊं लागले. त्याचें कारण म्हणजे त्यांत आढळून आलेली प्रखर रोगजंतुनाशक शक्ति हें होय. सामान्यतः, दहा लाख प्रांगारिक पदार्थांमध्यें कोणता पदार्थ जतुनाशक असेल हें सांगणें कठीण. त्या पदार्थांच्या अंतर्गत रचनेवरून व परमाणूंच्या घटनेवरून थोडीशी कल्पना अलिकडे येऊं लागलेली आहे. आतापर्यन्त रोगजंतुनाशक म्हणून सांपडलेले पदार्थ प्रायः अचानक, अवचितपणेंच सांपडलेले आहेत. त्या औषधांच्या संशोधनाची दिशा ठरलेली नव्हती. त्यामुळें हे शोध लावणारे संशोधक एका दृष्टीनें भाग्यवानच म्हटले पाहिजेत. कारण त्यांची बुद्धिमत्ता जरी त्यांच्या सूक्ष्म निरीक्षणांत दिसून येते तरी त्या कामीं त्यांना लाभलेल्या संधीचें त्यांना साहाय्य झालेलें आहे.

प्रोन्टोसिल असेंच अकस्मात् जगापुढें आलें, यांत








आश्चर्य नाहीं. प्रोन्टोसिलच्या रोगप्रतिबंधक शक्तीचा जर्मन संशोधक डोमाक् ( Domagk 1935 ) याचें कार्य खूपच महत्त्वाचें आहे. त्यामुळेंच पुढची ही एवढी प्रगति घडून आलेली आहे. प्रोन्टोसिलमध्यें रोगनिवारण शक्ति आहे, एवढें समजल्यावर अनेक दृष्टींनीं प्रोन्टोसिलवर प्रयोग सुरू झाले. तशा प्रकारचे अनेक पदार्थ तयार करण्यांत आले. प्रोन्टोसिलच्या रोगनाशक शक्तीचा अभ्यास सुरू झाला. त्यांतूनच कळून चुकलें कीं, प्रोन्टोसिल हें सर्वस्वीं रोगसंहारक नसून त्याचा एक विशिष्ट भागच रोगजंतूंवर हल्ला करतो. तो भाग म्हणजे सल्फानिलामाईड हा होय. सल्फानिलामाईडपासून अझो रंग ( प्रोन्टोसिल ) तयार न करतां प्रयोग झाला. तेव्हां सल्फानिलामाईड-सुद्धां तितकेंच उपयोगी दिसून आलें. सल्फानिला-माईडची उपयुक्तता त्यामुळें वाढली. म्हणून त्याची निर्मिति सुरू झाली. इंग्लंड, अमेरिका व जर्मनी या देशांत १९३७ च्या सुमारास कारखाने सुरू होऊन त्यांतून हजारों रत्तल सल्फानिलामाईड तयार होऊं लागलें. अनेक संशोधकांचें व डॉक्टरांचें सल्फानिला-माईडकडे लक्ष गेलें. त्यांनीं निरनिराळ्या रोगांवर त्याचे प्रयोग सुरू केले. विविध ताप, देवी, विषमज्वर, इत्यादि विविध रोगांवर तें उपयुक्त दिसून आलें. डॉक्टरांना खूपच आनंद झाला. संशोधनकार्य सुरूंच होतें. त्यांतून पुढें असेंहि बाहेर आलें कीं, सल्फानिलामाईडपासून कांहीं व्याधीहि जडतात. रोग निवारतां येतो हें खरें, पण त्याचबरोबर रक्तनिर्मितीवर परिणाम होऊन अशक्तपणा येतो आणि तो अशक्तपणा बरा होऊंच शकत नाहीं. असे आनुषंगिक दुष्परिणाम टाळण्याच्या दृष्टीनें सल्फानिलामाईडपेक्षां जास्त गुणकारी असा पदार्थ शोधण्याकडे संशोधकांचें लक्ष लागलें. सल्फा–औषधांवर रसायनशास्त्रज्ञ व डॉक्टर या दोघांचें लक्ष केन्द्रित झालें. शास्त्रज्ञांचीं गटागटानें कामें सुरू झालीं. जर्मनी, इंग्लंड, अमेरिका व भारत यांनीं या संशोधनांत प्रामुख्यानें भाग घेतला. फ्रान्समधल्या पाश्चर-इन्स्टिटयू-टनें व भारतांतल्या हाफ्किन् इन्स्टिटयूटनें महत्त्वाची कामगिरी केली. अनेक संशोधक या कामाकडे लागले. रसायनशास्त्रज्ञांनीं एकट्या सल्फानिलामाईडपासून पांच हजार पदार्थ तयार केले.

प्रश्न उरला ह्या सर्व पदार्थांची तपासणी करण्याचा. अर्थात् तें काम फारच वेळ घेणारें व खर्चाचें आहे. कारण एखादा नवीन पदार्थ औषधी कामांत उपयोगी ठरेल हें पाहण्याकरितां त्याच्यावर अनेक प्रयोग केले जातात. पहिली गोष्ट म्हणजे तो रोगजंतूंना ठार मारतो किंवा नाहीं, ही होय. त्यासाठीं एका परीक्षानळींत रोग-जंतू घेतात आणि त्यांत हा पदार्थ टाकतात. मायक्रो-स्कोपच्या साहाय्यानें किती जंतू मेले हें समजतें. तेथें जंतुसंहारक गुणधर्म दिसून आल्यास तोच रोग उंद-रांना करण्यांत येतो आणि मग या औषधी पदार्थाची उपाययोजना करण्यांत येते. पुढें आवश्यक वाटल्यास ससा, कुत्रा किंवा गाय यांवर प्रयोग होतो. त्यांत यश आलें तरच माणसांच्या शरीरावर त्या पदार्थांचा प्रयोग कर-तात. मानवी शरीरांत त्या पदार्थानें प्रवेश केल्यावर त्यानें रोगजंतूवरच हल्ला करावा अशी अपेक्षा असते. तसें न झाल्यांस व कांहीं दुष्परिणाम दिसून आल्यांस त्या पदार्थाचा उपयोग होऊं शकत नाहीं.

यावरून लक्षांत येईल कीं, एखादा पदार्थ औषधी पदार्थ म्हणून जरी आढळून आला तरी त्याचा उपयोग सुरू होणें किती कठीण काम आहे ! म्हणूनच सल्फानिलामाईड-पासून तयार झालेल्या पांच हजार पदार्थांची अद्यापि संपूर्णपणें तपासणी झालेली नाहीं. ज्या कांहीं थोड्या पदार्थांची तपासणी झाली त्यांत वीस पदार्थ बरेच उप-युक्त दिसून आले. ते म्हणजे सल्फा-पिरीडीन, सल्फा-थायाझोल, सल्फा-पाय-याझीन, सल्फा-मिथॅझोल इत्यादि होत. मात्र हीं सर्व सल्फा औषधें रोगजंतूंची वाढ थांबवितात, त्यांचा समूळ संहार करित नाहींत. या पदार्थांच्या रचनेकडे पाहिल तर सल्फानिलामाईड त्यांत आहेच. त्यांतला हायड्रोजनचा परमाणु काढून दुसरे कांहीं पदार्थ घातले, त्याबरोबर सल्फानिलामाईडची रोगप्रतिबंधक शक्ति वाढली आणि दुष्परिणाम दूर झाले, असें दिसून आलें. सल्फा-थायाझोल हें सल्फा-निलामाईडच्या पन्नासपट जास्त परिणामकारक आहे आणि त्यांत दुष्परिणाम मुळींच नाहीत. त्यामुळें त्याचा आज सर्रास उपयोग सुरू आहे.

वरील सर्व पदार्थांना मिळून ' सल्फा-ड्रग्ज ' असें संबोधिलें जातें. बाजारांत वीस तरी निरनिराळे सल्फा-पदार्थ औषध म्हणून विक्रीला ठेवलेले आहेत. अर्थात्, प्रत्येकाला व्यापारी दृष्ट्या कित्येक नांवें आहेत. नुसत्या सल्फानिलामाईडला पंचवीस नांवें आहेत ! अनेक नांवां-



अनुक्रमणिका






खालीं यांचीं मिश्रणें करून किंवा स्वतंत्रपणें विकलीं जातात. गोळ्या किंवा तत्सम स्वरूपांतच ही औषधें बऱ्याच प्रमाणांत दिसून येतात. १९३७ नंतर प्रत्येक वर्षीं एकदोन तरी नवीन सल्फा औषधें पुढें आलीं आहेत. कित्येकांची रोगप्रतिबंधकशक्ति मोजली असतां तींत जीं गुणकारी दिसून आलीं तीं डॉक्टरांनीं वापरावयास सुरवात केली. [१]

सल्फा औषधांची रोगप्रतिबंधक शक्ति कळून चुकल्यावर प्रत्येक रोगांवर तें औषध किती प्रमाणांत घ्यावयाचें व कसें घ्यावयाचें हें ठरविण्यांत येतें. सल्फा औषधें कमी प्रमाणांत घेतलीं तर उलटाच परिणाम होतो हें माहीत आहेच. म्हणून तीं बाजारांत विकतांना डॉक्टरांच्या परवानगीशिवाय विकलीं जाऊं नये असा निर्बंध भारत-सरकारनें घातला आहे. म्हणून ह्या औषधांचे डोझ व घेण्याची पद्धत ही डॉक्टरांनीं सांगितल्याप्रमाणेंच असते. अर्थात् डॉक्टर सुद्धां पूर्वीच्या प्रयोगावरून जास्तींत जास्त उपयोगी डोझ रोगाच्या परिस्थितीवरून ठरवितात. सल्फा औषधें बाजवीपेक्षां कमी प्रमाणांत गेलीं तर रोगजंतूंनाच त्याचा उपयोग होतो. मानवी शरीराला इनॉक्युलेशन करतात आणि देवीचे, कॉलऱ्याचे किंवा विषमज्वराचे मृत जंतु मानवी शरीरांत सोडतात. त्यामुळें मानवी रक्तांतील रोगप्रतिबंधक शक्ति वाढते. तसलाच प्रकार रोगजंतूंच्या बाबतींत होतो. कमी प्रमाणांत असलेल्या सल्फा औषधांवर रोगजंतूंना विजय मिळतो. व मग तीं सल्फा औषधें रोगांवर निरुपयोगी ठरण्याची भीति असते. त्यासाठीं डाक्टरांच्या सल्ल्यानें हीं औषधें घेणेंच हितावह होय.

त्याचप्रमाणें पथ्याच्या बाबतींत दक्षता घेणें जरूर आहे. सल्फा औषधें रोग्याला दिलीं आणि रोग्याच्या शरीरांत जर पॅरा-अमिनो-बेन्झाईक-ॲसिड नांवाचा पदार्थ असला, तर तो रोगजंतूंना मदत करतो, एवढेंच नव्हे तर सल्फा औषधांपासून त्या रोगजंतूंचें संरक्षण करतो. त्यामुळें अशा वेळीं सल्फा औषधाचा उपयोग होत नाहीं. म्हणून पॅरा-अमिनो-बेन्झाईक-ॲसिड हें रोग्याच्या शरीरांत असलें तर सल्फा औषधीचा उपयोग होणार नाहीं. त्यासाठीं हा पदार्थ असलेले कांहीं खाद्य पदार्थ रोग्याच्या खाण्यांत येऊं नयेत, याबद्दल दक्षता घेतली पाहिजे. अमिनो-बेन्झाइक-ॲसिड किंवा तत्सम बीस पदार्थ सल्फा औषधांचा उपयोग होऊं देत नाहींत. कारण, ते जंतूंचे खाद्य पदार्थ आहेत. त्याचप्रमाणें या ॲसिड-पासून थोड्या फरकानें तयार झालेले व्हिटॅमिन बी किंवा यीस्ट सारखे पदार्थ पॅरा-अमिनो-बेन्झाइक ॲसिडसारखे असून ते सल्फा औषधांची क्रिया पर्यायानें होऊं देत नाहींत, हें सप्रयोग सिद्ध झालेलें आहे. पॅरा-अमिनो-ॲसिडचा थोडा जरी अंश असेल तरी त्यामुळें त्याच्या शेंकडोंपट असलेलीं औषधें

---

१ खालीं सल्फाड्रग्जचीं नांवें, उपयोग व रोगप्रतिबंधक शक्तीचें प्रमाण दिलें आहे.
सल्फानिलामाईडची शक्ति जर एकपट तर सल्फासिटॅमाईडची आठपट, सल्फापिरिडिनची तेरापट अशा रीतीनें शेवटचा स्तंभ वाचावा.

| | नांव | उपयोग | रोगप्रतिबंधक शक्ति |
|---|---|---|---|
| (१) | सल्फानिलामाईड | वरून लावण्यासाठीं | १ |
| (२) | सल्फासिटॅमाईड | ” | ८ |
| (३) | सल्फापिरिडीन | न्यूमोनिया | १३ |
| (४) | सल्फाथायाझोल | खूप प्रभावी रोगजंतूंसाठीं. | ५० |
| (५) | सल्फामेराझिन | हीं कमी प्रभावी रोगजंतूसाठीं असून त्यांचे दुष्परिणाम फारच कमी. तीं विविध रोगांवर आहेत. | २० |
| (६) | सल्फाडायाझिन | | ३६ |
| (७) | सल्फामेझाथीन | | १३ |
| (८) | सल्फापायऱ्याझिन | | |
| (९) | सल्फाग्वानाडिन | बॅसिलरी डिसेन्ट्री | ५० |
| (१०) | इर्गाफिन | | ४ |








निरुपयोगी होत असतात. पॅरा-अमिनो-बेन्झाईक ॲसिड निसर्गांत आढळून येणाऱ्या बऱ्याच पदार्थांत फार थोड्या प्रमाणांत पण विविध स्वरूपांत असतें. म्हणूनच या किंवा यासारख्या पदार्थाच्या सांनिध्यांत सल्फा औषधांची क्रिया होऊं शकत नाहीं.

जगांत प्रांगारिक पदार्थांवरील रासायनिक संशोधनानें खूपच क्रांति केली आहे. मानवी प्रयत्नानें आतांपर्यंत रबर, रंग, प्लास्टिक, औषधें तयार करतां येऊन त्यांचाच खूप उपयोग वाढला आहे. कृत्रिम रंग, कृत्रिम रबर किंवा प्लास्टिक यांचाच सर्वत्र उपयोग करतात. ही सर्व प्रगति अवघ्या सव्वाशें वर्षांत झाली. औषधांच्या बाबतींत तर संशोधकांनीं व डॉक्टरांनीं मोठीच करामत करून दाखविली आहे. गेल्या चाळीस वर्षांचा इतिहास किती गमतीदार आहे, हें सल्फा औषधींच्या उदाहरणावरून स्पष्टच दिसतें. १९०८ मध्यें तयार झालेलें सल्फानिलामाईड पंचवीस वर्षे तसेंच पडून राहिलें. नंतर पुढच्या वीस वर्षांत तद्विषयक संशोधन होऊन त्यांत एवढी प्रचंड प्रगति झाली. त्यासाठीं हजारों संशोधक काम करीत आले आणि कित्येक कारखाने सल्फा-औषधें तयार करण्यासाठीं निघाले. त्याच दिशेनें संशोधकाचे प्रयत्न सुरू असून अनेक नवीन औषधें जगापुढें येत आहेत आणि येतील !

---

## पत्रव्यवहार

## साम्राज्यवादी राष्ट्रें आणि उपासमार

श्री. संपादक ' नवभारत ' यांसी

आपल्या मासिकाच्या डिसेंबर १९५३ च्या अंकामध्यें, डॉ. कॅस्ट्रो यांच्या ' Geography of Hunger ' या पुस्तकाच्या आधारें मी 'नवभारता'-च्या नोव्हेंबरच्या अकांत लिहिलेल्या लेखासंबंधीं श्री. नी. वि. सोवनी यांचे एक पत्र प्रसिद्ध झालें आहे.

डॉ. कॅस्ट्रो यांनीं उपासमार व लोकसंख्येची वाढ यासंबंधीं जो जीवशास्त्रीय सिद्धांत मांडला आहे तो असिद्ध व अशास्त्रीय आहे, अन् मुळांतच असिद्ध नि अशास्त्रीय मतांच्या आधारें लिहिलेल्या माझ्या लेखांतील विवेचन अशास्त्रीय आहे असें पत्र-लेखकाचें म्हणणें दिसते. माझ्या लेखासंबंधीं मी पुढील खुलासा करूं इच्छितों.

अन्नविषयक समस्या सोडविण्यासाठीं लोकसंख्येंत होणारी भरमसाट वाढ थांबविलीच पाहिजे असा सतत प्रचार सध्या चालू आहे. या प्रचारानें परिणाम केलेल्या परिस्थितींत डॉ. कॅस्ट्रो यांचें पुस्तक माझ्या वाचनांत आलें. त्यांचा दृष्टिकोण मला वेगळा वाटला अन् त्याकडे मी आकर्षित झालों. डॉ. कॅस्ट्रो यांनीं आपल्या पुस्तकांत जे जीवशास्त्रीय सिद्धांत मांडले आहेत ते शास्त्रीय कां अशास्त्रीय याचा विचार मी केला नाहीं. त्यांच्या पुस्तकाचें मला वैशिष्ट्य वाटतें तें पुढील कारणासाठीं. शेतीच्या उत्पादनांत प्रचंड वाढ करण्यासाठीं शेतीची मशागत यांत्रिक पद्धतीनें व शास्त्रीय ज्ञानाच्या साहाय्यानें केली पाहिजे. पण हें करण्यांत मुख्य अडचण, वसाहतींचें पारतंत्र्य व वसाहतीमधील जमीनीची मक्तेदारी मालकी, ही येते. कारण वसाहती व मागासलेले देश यांमध्यें, पारतंत्र्य, साम्राज्यवादी राष्ट्रांकडून होणारी कुचंबणा व जमिनीची मक्तेदारी मालकी यामुळेंच शेतीच्या उत्पादनांत घट होत आहे व लोकांना उपासमार सहन करावी लागत आहे. प्रथम हे अडथळे दूर करणें आवश्यक आहे व त्यानंतरच अन्नोत्पादनांत वाढ करणें शक्य होईल असें डॉ. कॅस्ट्रो यांनीं आग्रहानें आपलें मत मांडलें आहे. साम्राज्यवादी राष्ट्रांनीं आपल्या वसाहतींमध्यें व मागासलेल्या राष्ट्रांत जें सामाजिक व राजकीय जीवन निर्माण करून अन्न व लोकसंख्येचा प्रश्न अवघड करून ठेविला तें राजकीय व सामाजिक जीवन बदलण्याची आवश्यकता डॉ. कॅस्ट्रो यांनीं प्रतिपादिली आहे.

मला स्वतःस त्यांच्या वरील आग्रही मतांत अशास्त्रीयता वाटत नाहीं. त्यांच्या पुस्तकांतील अन्नविषयक जीवशास्त्रीय चर्चा मी गौण समजतों. मला महत्त्व वाटतें तें वसाहतींच्या स्वातंत्र्याचा पुरस्कार, शेती-सुधारणा व त्यासाठीं शेतीच्या मालकीमध्यें आवश्यक ते फेरबदल—ह्यांविषयीं जें मत डॉ. कॅस्ट्रो यांनीं मांडलें आहे त्याची !

त्यांच्या पुस्तकांतील याच विवेचनाकडे 'नवभारता'च्या वाचकांचें लक्ष वेधण्याचा माझा उद्देश होता.

आपला

१५-१२-५३ **रा. अ. करंदीकर**

पलूस








# भाषावार प्रांतरचना : एक महत्त्वाचें संस्मरणीय विवेचन

आंध्रराज्याच्या निर्मितीनंतर भारतांतील भाषावार राज्यरचनेचें तत्त्व आतां वादातीत झालें असून त्याच्या अंमलबजावणीच्या बाबतींत आंध्रराज्यामुळें निश्चितपणें पुढें एक पाऊल पडलें आहे. त्यापुढचीं पाउलें म्हणजे संयुक्त महाराष्ट्र, कर्नाटक वगैरे दक्षिणेकडील भाषावार राज्यांची निर्मिति हीं अपेक्षित असून, त्या दृष्टीनें पुढील विचार करण्याकरितां भारतसरकारतर्फे श्री. फझल अली यांच्या अध्यक्षतेखाली एक **उच्चाधिकारसमिति** नेमली गेल्याचें नुकतेंच जाहीर झालें आहे. भाषावार प्रांतरचनेचें तत्त्व वादाच्या कक्षेपलीकडे गेलेलें असलें, तरी अनेक हितसंबंधांनीं प्रेरित झालेल्या कित्येक जबाबदार नेत्यांकडून भाषावार राज्यरचनेच्या तत्त्वाला विरोध होत आहे तर कित्येकांकडून ; भाषावार राज्यरचनेचा प्रश्नच सध्या लांबणीवर टाकावा असा प्रचार होत आहे. या जबाबदार लोकांकडून आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ जे अनेक युक्तिवाद पुढे केले जातात, ते व त्यांना दिलेलीं समर्पक उत्तरें हीं सर्व वृत्तपत्रें वाचणाऱ्यांच्या परिचयाचीं आहेतच.

प्रस्तुत स्थळीं, २५ वर्षांपूर्वीं त्या वेळच्या देशांतील मान्यवर नेत्यांनीं भाषावार प्रांतरचनेबाबत जें मूलग्राही विवेचन केलें आहे, तें अनुवादरूपानें पुढें संकलित केलें आहे. १९२८ सालीं **डॉ. अनसारी** यांच्या अध्यक्षतेखालीं एक सर्वपक्षीय परिषद् (All Parties Conference) भरली होती. तिनें एक 'नागरिकांच्या मूलभूत हक्कावर आधारलेली संपूर्ण जबाबदार स्वराज्याची घटना' (Constitution for full Responsible Government based on Declaration of Rights) तयार करण्याकरितां एक तज्ज्ञांची समिति **पं. मोतीलाल नेहरू** यांच्या अध्यक्षतेखालीं नेमली. समितीच्या सभासदांमध्यें सर तेजबहादुर सप्रू, श्री. मा. श्री. अणे, श्री. ना. म. जोशी, सर अली इमाम इत्यादि विविध विचारसरणींचे प्रतिनिधी होते. त्यांनीं जो रिपोर्ट ऑगस्ट १९२८ मध्यें सादर केला तो लगेच सर्वपक्षीय परिषदेनें मान्य केला. तो रिपोर्ट 'नेहरु रिपोर्ट' या नांवानें प्रसिद्ध आहे. त्या रिपोर्टमध्यें **'भाषावार प्रांतरचना'** या मुद्द्याला एक स्वतंत्र प्रकरण दिलें असून त्यांत 'भाषावार प्रांतरचना लोकशाहीला किती आवश्यक आहे' याचें मूलग्राही विवेचन केलें आहे. संयुक्त महाराष्ट्राचे एक अत्यंत प्रभावी पुरस्कर्ते, भाषावार प्रांतरचनेच्या प्रश्नाबाबतचे एक तज्ज्ञ, सुप्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ डॉ. धनंजयराव गाडगीळ यांनीं कांहीं दिवसांपूर्वीं नागपूर येथें जें या प्रश्नाबाबत भाषण केलें त्या भाषणांत, उपरिनिर्दिष्ट नेहरु-रिपोर्टमध्यें भाषावार प्रांतरचनेबाबत केलेल्या विवेचनाचा त्यांनीं गौरवपूर्वक केलेला उल्लेख वृत्तपत्रवाचकांच्या स्मरणांत असेल.

नेहरूरिपोर्टमधील विवेचनाबाबत आणखी एका गोष्टीचा उल्लेख केला पाहिजे. **पं. जवाहरलाल नेहरू** हे त्या वेळीं कॉंग्रेसचे सरचिटणीस होते. पं. मोतीलाल नेहरू यांच्या अध्यक्षतेखालीं नेमल्या गेलेल्या उपरिनिर्दिष्ट समितीचे ते सभासद नसले तरी त्यांनीं समितीच्या कामकाजांत आपुलकीनें भाग घेतला होता. ते निमंत्रणावरून समितीच्या बहुतेक सर्व सभांना हजर राहिले होते व कमिटीच्या कामांत हरघडीला त्यांनीं अत्यंत मोलाचें साहाय्य केलें असा त्यांच्याविषयीं अत्यंत गौरवपूर्ण उल्लेख कमिटीच्या रिपोर्टांत केलेला आहे

१९२८ मधील सर्वपक्षीय परिषदेनें नेमलेल्या नेहरूसमितीच्या उपरिनिर्दिष्ट रिपोर्टमधील प्रांतांच्या फेरविभागणीबाबत केलेल्या विवेचनांतील महत्त्वाचा भाग पुढें दिला आहे :

"प्रत्येकाला माहीत आहे कीं सध्यांची जी प्रांतांची विभागणी आहे ती विचारपूर्वक झालेली नाहीं. ती सर्व प्रसंगवशात्, जसजशी ब्रिटिश सत्ता या देशांत स्थापित होऊन वाढत गेली त्या परिस्थितीनुसार घडून आलेली आहे. भौगोलिक, ऐतिहासिक, आर्थिक वा भाषिक अशा कोणत्याहि तत्त्वाशीं सध्यांच्या प्रांतविभागणीचा संबंध नाहीं. केवळ राज्यकारभाराच्या दृष्टीनें जरी विचार केला तरीहि सध्यांची प्रांतविभागणी








यशस्वी झालेली नाहीं. म्हणून प्रांतांची फेररचना किंवा पुनर्विभागणी झाली पाहिजे हें उघड आहे. आपणांपैकीं कोणाला छोटे प्रांत हवे आहेत, कोणाला मोठे हवे आहेत. छोटे-मोठे हा भाग सोडून दिला तरी प्रांतांच्या पुनर्विभागणीचा प्रश्न हा सोडविलाच पाहिजे.

"मग ही पुनर्विभागणी कोणत्या तत्त्वांवर व्हावी ? ह्यांपैकीं कांहीं तत्त्व अंशतः भागोलिक, अंशतः आर्थिक अशीं आहेत. पण त्यांपेक्षांहि या विभागणीच्या बाबतींत जर मुख्य भर कोणत्या मौलिक तत्त्वांवर असेल तर तीं त्या त्या भागांतील लोकमत आणि त्या त्या विभागाची भाषिक एकात्मता हीं दोन होत. एकाद्या विभागांतील लोकांची शैक्षणिक तशीच सर्वसाधारण सांस्कृतिक प्रगति, किंबहुना त्या लोकांच्या जीवनांतील सर्वच अंगोपांगांची प्रगति जर शीघ्र घडवून आणावयाची असेल तर त्याचें भाषा हेंच मुख्य साधन आहे हें सर्वमान्यच आहे. शिक्षणाचें माध्यम जर परकीय भाषा असेल तर त्या देशाचा सर्व व्यवहार, व्यापार – त्याचें सर्व जीवनच खुरटून जाणार हें ठरलेलेंच. जेथें परकीय भाषेच्या द्वारा हे सर्व व्यवहार होतात, तेथें लोकशाही नांदणें शक्यच नाहीं. सार्वजनिक व्यवहारांतून जर लोकांनीं स्वतः परिणामकारक भाग घ्यावयाचा असेल म्हणजेच जर खरी लोकशाही प्रस्थापित व्हायची असल तर त्या लोकांना किंवा त्या लोकशाहीला आपल्या सार्वजनिक व्यवहाराचें ज्ञान झालें पाहिजे, ते व्यवहार नीट समजले पाहिजेत, त्यांचा कार्यकारणभाव नीट आकलन झाला पाहिजे. परकीय भाषेंतूनच जर बहुतेक व्यवहार केले गेले तर लोकशाहीनुसार ते सर्व व्यवहार झाले असें म्हणणें विचाराच्या पलीकडचें आहे. म्हणून त्या त्या विभागांतील सर्वसामान्य जनतेची जी भाषा असेल त्या भाषेंतूनच त्या विभागाचा कारभार व व्यवहार होणें आवश्यक होय. म्हणून प्रांतांच्या दृष्टीनें विचार करतां प्रांतांची जी भाषा तीच प्रांत-विभागणीचें तत्त्व ठरतें.

"याचा अर्थ आम्हीं इंग्रजीच्या विरुद्ध आहोंत असा नव्हे. उलट, सध्यांच्या आपल्या अपरिहार्य परिस्थितीचा विचार करतां आम्हांला असें वाटत कीं हल्लींप्रमाणेंच पुढेंहि कांहीं काळपर्यंत मध्यवर्ती कायदेमंडळांतील चर्चा-भाषणांचें माध्यम इंग्रजी राहिलें पाहिजे. याशिवाय इतर देशांतील विचार, शास्त्रें आणि लोक – जीवन या गोष्टींशीं आमचा संबंध राहून तो वाढावा याकरितां एक परकीय भाषा शिकणें— आणि ती सध्यां इंग्रजीच संभवनीय आहे – आवश्यक होय असें आमचें मत आहे. तथापि, आम्हांस ठामपणें असें वाटतें कीं आज जी हिंदुस्थानी भाषा अर्ध्या हिंदुस्थानची भाषा आहे ती सर्व हिंदुस्थानची भाषा व्हावी. पण हें सर्व झालें तरी प्रादेशिक किंवा प्रांतिक भाषा यांचें संवर्धन झालेंच पाहिजे. प्रांताची प्रगति जर आपणांस घडवून आणावयाची असेल, तर आपण त्या प्रांताला त्याचा सर्व व्यवहार त्याच्या प्रांतभाषेंतूनच करायला लावलें पाहिजे.

"प्रांताचें शिक्षण आणि दैनंदिन कारभार त्या प्रांताच्या बहुजनसमाजाच्या भाषेंतूनच व्हावयाचा तर तो प्रांत भाषावारच असला पाहिजे. जर तो प्रांत बहुभाषी राहिला तर सारख्या अडचणी उत्पन्न होत राहतील, शिक्षणाच्या व व्यवहाराच्या भाषा दोन किंवा अधिकहि होऊन राहतील. त्याकरितां प्रांतांची पुनर्रचना भाषिक तत्त्वावरच करणें इष्ट होय. सामान्यतः असें दिसून येतें कीं, त्या त्या भाषेबरोबर त्या त्या भाषिकांची एक विशिष्ट सस्कृति असते, विशिष्ट परंपरा असते, त्यांचें विशिष्ट वाङ्मय असतें. भाषावार प्रांतरचना झाल्यास, या गोष्टी त्या प्रांताची सर्वांगीण प्रगति घडवून आणण्यास सहायभूत होतील.

"भाषावार प्रांतरचनेचें हें तत्त्व कॉंग्रेसनें आठ वर्षांपूर्वींच मान्य केलें असून, कॉंग्रेस-संघटनेन आपल्या पुरते हिंदुस्थानचे भाषावार प्रांत पाडलेच्च आहेत.

"प्रांताची पुनर्रचना करतांना भाषावार तत्त्वाशिवाय आणखीहि एका तत्त्वाचा विचार केला पाहिजे. तें दुसरें तत्त्व म्हणजे त्या त्या प्रदेशांतील लोकमत होय. मोठ्या क्षेत्रांत स्वयंनिर्णयाचा हक्क असावा असें आपण म्हणत असतों. म्हणून लहान क्षेत्रांत तो स्वयंनिर्णयाचा हक्क आपणांस नाकारतां येणार नाहीं. अर्थात् लहान क्षेत्रांत असा स्वयंनिर्णयाचा हक्क मान्य करतांना, तो इतर महत्त्वाच्या जिव्हाळ्याच्या गोष्टींना विघातक होणार नाहीं, याबद्दल आपण सावध राहिलें पाहिजे. – एकाद्या विभागांतील लोकांना जर असें वाटत असेल कीं 'आपण एक आहों व आपणांस आपली विशिष्ट संस्कृति वाढवायची आहे' तर त्यांची ही मागणी ऐतिहासिक वा सांस्कृतिक दृष्ट्या समर्थनीय



अनुक्रमणिका








नसली तरी ते ज्या अर्थी अशी मागणी करीत आहेत त्या अर्थी त्यामागील महत्त्वपूर्ण भावना आपण विचारांत घ्यावयास हवी. अशा गोष्टींत वस्तुस्थितीपेक्षां भावनेलाच अधिक महत्त्व असतें.

"वरील निवेचनावरून दिसून येईल कीं, एक भाषा आणि बहुसंख्याक लोकांची इच्छा ह्या दोन गोष्टी प्रांतांची पुनर्विभागणी करतांना अत्यंत महत्त्वाच्या गणल्या पाहिजेत. तिसरीहि एक गोष्ट, जरी ती तितकीच महत्त्वाची नसली तरी, आपण लक्षांत घेतली पाहिजे. ती म्हणजे राज्यकारभाराची सोय ही होय. अर्थात् त्या त्या भागाचें भौगोलिक स्थान, नैसर्गिक संपत्ति, आर्थिक स्थैर्य या गोष्टींचा विचार राज्यकारभारामध्यें समाविष्ट आहे. परंतु राज्यकारभाराची सोय तरी शेवटीं कारभाराची, विशिष्ट व्यवस्थेचीच (arrangement ची) बाब आहे. शेवटीं प्राधान्य लोकमतालाच असून, राज्यकारभाराची सोय ही लोकमतानुवर्ती झाली पाहिजे.

"हिंदुस्थानच्या नकाशाकडे या दृष्टीनें पाहिलें तर आमच्या डोळ्यापुढें निरनिराळे भाषावार विभाग स्पष्ट व निश्चित असे उभे रहातात. पंजाबमधील पंजाबी भाषेच्या रूपानें हिंदुस्थानींत थोडा फरक झाला असला तरी उत्तर हिंदुस्थानभर हिंदुस्तानीं-भाषिकांचा सलग भाग आहे असें म्हणतां येईल. त्यानंतर बंगाली, आसामी, ओरिया, तेलुगु, तामीळ, मल्याळी, कानडी, मराठी, गुजराती, सिंधी अशा भाषा बोलणारांचे भाग आहेत."

यानंतर नेहरु-कमिटीनें आपणांकडे फक्त कर्नाटक व सिंध हे स्वतंत्र प्रांत करण्याबाबत आलेल्या निवेदनांचा उल्लेख केला असून, कर्नाटकीयांतर्फे स्वतंत्र कर्नाटकाची केलेली मागणी व मांडलेली बाजू माहितीपूर्ण व समाधानकारक आहे, असा तिचा गौरवपूर्ण निर्देश केला आहे. आपले निष्कर्ष मांडतांना कमिटीनें त्या वेळच्या हिंदुमुसलमानसंबंधाच्या विशिष्ट परिस्थितींत आवश्यक म्हणून सिंध, त्याशिवाय कर्नाटक व वायव्य सरहद्द प्रांत हे स्वतंत्र करावेत अशी शिफारस केली आहे.

---

## अवचित ये जाग मला—!

अवचित ये जाग मला
सरलेली मध्यनिशा
क्षितिजाच्या सीमेवर
अजुन दूर दूर उषा.
गाउनिया आर्त गीत
भृंग झोंपले फुलांत
निजलेलीं पानफुलें
अजुन विश्व शांत शांत.
शयनीं मम शुभ्र फुलें
ढाळितसे पारिजात
दरवळतो मधुर गंध
–अंगणांत मी निवान्त.
गगनाच्या फलकावर
ताऱ्यांनीं लिहिलेलें
विश्वाचें दिव्य काव्य
वाचुनिया मन दिपलें.

हें अगाध, हें अनंत
विश्वसख्या, रूप तुझें
उत्तर रात्रींत मला
दर्शन दे कोण दुजें ?
तूंच मला दिससी रे
सृष्टीच्या अंकावर
पवनाच्या लहरीवर
गात गात गीत मंद्र.
तूंच मला जागविलें
अवचित कीं झोंपेंतुन
दूर अनन्तांत मला
नेशिल कां बोट धरुन ?
एकटाच मी येथें
तूं कोठें येशी पण ?
गहिंवरला अंधारहि
दहिंवरलें वरुनि गगन !

—सूर्यकान्त खाण्डेकर








स्थूल ऐतिहासिक समालोचन : श्री. मा. प. मंगुडकर

# व्यक्ति-स्वातंत्र्याच्या कल्पनेचा उद्गम व विकास

व्यक्ति-स्वातंत्र्य म्हणजे राज्यघटनेप्रमाणें दिलेला साधा अधिकार नव्हे, तर तो एक अत्यंत मोलाचा मूलभूत अधिकार आहे. मानवी हक्काची उंच स्वरांत पुकारलेली ती एक घोषणा आहे. त्यामागें जीवनाचें विशाल तत्त्वज्ञान खडें आहे आणि म्हणूनच या श्रेष्ठ मूल्याभोंवतीं मानवी जीवनाचे सारे प्रश्न केंद्रित झाले पाहिजेत असें मत राज्यशास्त्रज्ञांप्रमाणें इतर समाज-शास्त्रज्ञ देखील वेळोवेळीं व्यक्त करीत असतात, या मूल्याचें अत्यंत दक्षतेनें संरक्षण आणि संवर्धन झालें पाहिजे म्हणून आग्रह धरतात. टॉक्विव्हिले यांनीं तर असे उद्गार काढलेले आहेत कीं, "स्वातंत्र्यावर आज-पर्यंत मी अविरतपणें प्रेमाचा वर्षाव करीत आलों, परंतु आतां ज्या काळांत मी रहात आहे त्या काळामध्यें नुसतें प्रेमच काय परंतु मी त्या स्वातंत्र्याची अक्षरशः पूजा करायला देखील तयार आहे." त्याचप्रमाणें माअलेर व्हॅन डेन ब्रुक यांनीं देखील स्वातंत्र्यावरील प्रेमाचें असेंच एके ठिकाणीं वर्णन केलें आहे. ते म्हणतात : "लोकशाहीविरोधी अशा साऱ्या शक्तींनीं स्वातंत्र्याविरुद्ध जणूं कांहीं एक प्रचंड कटच रचलेला आहे!" आगामी अशुभ घटनांच्या कृष्ण छाया स्वातंत्र्यावर पडलेल्या त्यांना स्पष्ट दिसत आहेत आणि म्हणूनच त्यांनीं स्वातंत्र्यप्रेमी अशा साऱ्या लोकांना मोठा धोक्याचा इशारा दिलेला आहे. या दोघांच्याप्रमाणेंच आणखी कितीतरी राज्यशास्त्रज्ञांनीं व्यक्तिस्वातंत्र्या-वरील आपलें अमर्याद प्रेम व्यक्त केलें आहे!

परंतु सर्वच विद्वानांचें प्रेम या तत्त्वज्ञानावर असलें तरी त्या सर्वांना एकच अर्थ अभिप्रेत आहे असें मानणें मात्र चूक ठरणार आहे. राज्यशास्त्राच्या क्षेत्रामध्यें या बाबतींत दोन स्वतंत्र विचारसरणी ( schools ) आपल्याला मान्य कराव्या लागतील. त्या वेगवेगळयाच नव्हेत तर थेट परस्परांच्या विरुद्ध आहेत असें आपणांस दिसून येईल. पहिला वर्ग हा समूहवादा-( collectivism ) चा पुरस्कर्ता असून 'समाजा-मध्यें, राष्ट्रामध्यें अगर समुदायामध्यें व्यक्तिस्वातंत्र्य समाविष्ट झालेलें असतें, त्यावांचून त्याला निराळें अस्तित्व असूंच शकत नाहीं असें त्याचें मत आहे. या विचारसरणीमध्यें मुख्यतः प्लेटो, हेगेल, कान्ट, बोसँक्वेट, ग्रीन इत्यादि आदर्शवादी आणि मार्क्स, एंजल्स, लेनिन इत्यादि साम्यवादी यांचा समावेश होतो, तर दुसरा वर्ग 'असंघटित व्यक्तिवादाचा' आश्रय घेतो. त्यांच्या मताप्रमाणें व्यक्तीचें स्वातंत्र्य आणि सुख हेंच प्रधान असतें आणि समाज, राष्ट्र अगर समूह यांना निराळा अद्भुत अर्थ चिकटविण्यांत अर्थ नाहीं. या वर्गामध्यें एपिक्यूरस्, बेन्थॅम्, पेन, जान स्टुअर्ट मिल, हयेक इत्यादि राज्यशास्त्रज्ञ मोडतात. या दोन्ही विचारांच्या या परस्परविरोधी कल्पना पडताळून पाहिल्याशिवाय स्वातंत्र्याची कोणतीहि कल्पना निश्चित करतां येणार नाहीं.

### एपिक्युरस : व्यक्तिस्वातंत्र्याचा जनक

एपिक्युरस हा आजच्या व्यक्तिस्वातंत्र्याच्या चळ-वळीचा जनक म्हटला पाहिजे. त्यानें प्रथम या वर्गाच्या विचाराची मुहूर्तमेढ रोंवली. त्याचा काळ म्हणजे इ. स. पू. ४ थें शतक होय. आजच्या व्यक्ति-स्वातंत्र्याच्या कल्पनेची सारीं ठळक वैशिष्ट्यें त्याच्या विचारामध्यें स्पष्ट प्रतिबिम्बित झालेलीं आहेत. त्याच्या तत्त्वज्ञानाचा अभ्यास करावयाचा झाल्यास त्याच्या काळच्या सामाजिक वा भौतिक परिस्थितीचें ज्ञान करून घेणें आवश्यक असतें. कारण अशा भौतिक परिस्थितीपासून अलग करून घेतलेल्या कोणत्याहि विचाराचा अभ्यास यथासांग होऊं शकत नाहीं. या दृष्टीनें त्या काळच्या सामाजिक जीवनाचें यथार्थ चित्र आपल्या डोळयासमोर उभें करणें अत्यंत आवश्यक आहे. एपिक्यूरसचा हा काळ म्हणजे सर्व राज्यशास्त्र-ज्ञांनीं म्हटल्याप्रमाणें मावळत असलेल्या ग्रीक संस्कृ-तीचा मंद सौम्य असा संधिप्रकाश होता. मॅसेडो-निआचा राजा फिलिप यानें ग्रीक साम्राज्य खिळखिळें








केलें होतें. स्पार्टा आणि अथेन्समधील लोकशाहीवरचा लोकांचा विश्वास उडाला होता. ' समूहासाठीं व्यक्ती असतात, व्यक्तींसाठीं समूह नसतो ' या तत्त्वाच्या उपयुक्ततेबद्दल जनतेचा अनुकंपनीय भ्रमनिरास झाला होता. आणि या सर्व परिस्थितीचा परिपाक म्हणून एपिक्युरसचा ' फुटीर किंवा असंघटित व्यक्तिवाद ' (atomised individualism) येणें अगदीं स्वाभाविक होतें.

' प्रत्येक व्यक्तीनें आपल्या सुखाचा आधीं विचार करायचा असतो. अनेक असंघटित अशा व्यक्तींचा समुच्चय म्हणजेच समाज होय. यावांचून समाजाला निराळें अस्तित्व असूं शकत नाहीं ' हा एपिक्युरसच्या विचाराचा गाभा होय. त्याच्याच शब्दांत हा विचार मांडायचा झाल्यास असें म्हणतां येईल कीं, " There is no such thing as human society. Every man is concerned for himself." अशा प्रकारच्या विचारामुळें सामाजिक स्थैर्यालाच धक्का बसेल व समाज विस्कळित होईल ही भीति इतरांप्रमाणें त्याला देखील वाटली असावी आणि म्हणूनच सामाजिक संघटनेसाठीं त्यानें मैत्रीचे रज्जू अधिक घट्ट करण्याचा सल्ला दिलेला आहे. मैत्रीच्या प्रेमळ संबंधावांचून माणूस समाजजीवन जगूं शकणार नाहीं असें त्यानें एके ठिकाणीं स्वच्छ म्हटलें आहे. "Of all the things which wisdom acquires to produce the blessedness of the complete life, by far the greatest is the possession of friendship." (Encyclopaedia of Social Sciences, ' Liberty ') – या त्याच्या वाक्यांतून दुसरा कुठला अर्थ ध्वनित होणें शक्य आहे ? परंतु असें असलें तरी एकंदरींत त्याच्या विचाराचा कल हा ' फुटीर व्यक्तिवादा'कडे झुकलेला होता, असें अनेक विद्वानांचें मत आहे. सवाना एकत्र गुंफणारा या स्वयंस्फूर्त मैत्रीशिवाय दुसरा कसलाच धागा त्याच्या ग्रंथामध्यें सांपडत नाहीं. आणि त्यामुळेंच त्याचा हा व्यक्तिवाद समाज-जीवनाच्या विनाशाला कारणीभूत होईल अशी शंका अनेकांनीं व्यक्त करून त्यावर टीकाहि केली आहे. परंतु असें असलें तरी अशा टीकेमुळें त्याच्या विधायक बाजूकडे दुर्लक्ष्य होण्याचा संभव आहे. एपिक्युरसच्या व्यक्तिवादांतील ही आत्यंतिकता वजा केली तर त्यांत स्फूर्तिप्रद बरेंच आढळेल असें वाटतें. विशेषतः त्यानें व्यक्तिहितावर दिलेला भर उल्लेखनीय आहे. ' व्यक्तीसाठीं समाज असतो, समाजासाठीं व्यक्ती नसतात ' हा त्याचा सिद्धान्त सागरांतील दीपगृहाप्रमाणें आजहि कित्येकांना वाट दाखवीत आहे. व्यक्तींच्या स्वयंस्फूर्त सहकार्यावर आधारलेला समाज हा त्याच्या दृष्टीनें आदर्शभूत होऊं शकतो. एपिक्युरसच्या व्यक्तिवादांतील आत्यंतिकता वगळून देखील त्यानें आधुनिक राज्यशास्त्राला दिलेली ही देणगी थोर आहे असेंच याबद्दल प्रत्येकाला म्हणावें लागणार आहे

## पुनरुज्जीवनाची चळवळ

एपिक्युरसनंतर बरींच शतकें व्यक्ति-स्वातंत्र्याचा इतिहास खंडित झाला होता. मध्ययुगामध्यें मात्र थंड गोळ्यासारख्या पडलेल्या या कल्पनेमध्यें थोडीशी ऊब निर्माण होऊं लागली. याचें श्रेय मुख्यतः त्या काळांतील धर्मसुधारक, तत्त्ववेत्ते, शास्त्रज्ञ आणि कवी यांना द्यावें लागेल. चवदाव्या-पंधराव्या शतकांमध्यें युरोपमध्यें पोपचें महत्त्व अगदीं शिगेला पोंहोचलें होतें. त्याच्या विरुद्ध अवाक्षर काढणें सामान्य माणसाला मुष्कील होऊन बसलें होतें. कोणालाहि कशाहि प्रकारचा दंड वा शिक्षा सांगणें त्याला अगदीं साधें, सोपें काम वाटे. सर्वांनीं आपल्या स्वातंत्र्याचें धन त्याच्या चरणापाशीं टाकावें आणि त्याला मनोभावें प्रार्थना करावी असा प्रकार चालला होता. इंग्लंडमध्यें इरॅस्मस, मूर, कॉलेट आदि धर्मसुधारकांनीं त्यावर प्रथम टीकास्त्र उगारलें. त्यांच्या या टीकेचा परिणाम पोपच्या अमर्याद सत्तेवर झाला यांत शंकाच नाहीं. परंतु याला खरा धक्का बसला तो दुसऱ्याच एका धर्मसुधारकाकडून आणि तो म्हणजे जर्मनीमध्यें उदयाला आलेला मार्टिन ल्यूथर हा होय ! कांहीं रक्कम उभी करण्यासाठीं पोपनें पापमुक्ततेच्या परवान्यां-(Indulgences) ची विक्री सुरूं केली. ल्यूथरनें पोपचा अधिकार धुडकावून लावला आणि पासामुळें पापमुक्ति न होतां पाप अधिकच वाढणार आहे असें प्रतिपादन करायला सुरवात केली. पोपनें त्याच्यावर सामाजिक बहिष्कार घालून त्याला समाजांत जगणें अशक्य करून टाकण्याचा चंग बांधला. ल्यूथरनें त्याला उत्तर म्हणून पोपच्या या परवान्यांची








सार्वजनिक ठिकाणीं जाहीर रीतीनें होळी केली आणि त्याच्या सत्तेस सुरुंग लावला. धार्मिक क्षेत्रामध्यें त्यामुळें पोपचें वर्चस्व उतरतीस लागलें, व पुढें तें नष्ट झालें. व्यक्ति-स्वातंत्र्याच्या इतिहासांत ल्यूथरच्या या बंडास अग्रस्थान द्यावें लागेल.

त्याचप्रमाणें तत्त्ववेत्त्यांनीं देखील त्यांच्या क्षेत्रांत स्वातंत्र्याची नौबत झडत ठेविण्याचा प्रयत्न चालूं केला. प्लेटो, ॲरिस्टॉटल् यांच्या ग्रंथांच्या परिशीलनाला त्यांनीं सुरुवात करून, स्वतःच्या बुद्धीला प्रमाण मानून त्यांतील पाहिजे तेवढें घेऊन बाकीचें टाकून द्यायला सुरुवात केली. शब्दप्रामाण्यवादाला त्यांनीं विराम दिला आणि बुद्धि-स्वातंत्र्याच्या इतिहासास प्रारंभ केला. बर्ट्रांड रसेल यांनीं त्यांच्या या कामागिरीचा आपल्या ‘ The History of Western Philosophy ’ या पुस्तकांत अत्यंत यथोचित शब्दांत गौरव केलेला आहे.

धर्म आणि तत्त्वज्ञान या दोन्ही क्षेत्रांप्रमाणें विज्ञानाच्या क्षेत्रांत देखील स्वातंत्र्याचें वारें खेळूं लागलें. ब्रूनो, कोपर्निकस्, गॅलिलिओ, केप्लर, न्यूटन आदि शास्त्रज्ञांनीं ज्ञानाच्या जोरावर विश्वांतील नवीं सत्यें हुडकून काढलीं व बायबल–माहात्म्य बऱ्याच प्रमाणांत कमी केलें. ‘ पृथ्वी स्थिर असून सूर्य फिरत असतो ’ या बायबलमधील कल्पनेला ब्रूनोनें धक्का दिला व त्यांतील सत्यास आव्हान दिलें. त्याच्या या पाखंडी मताबद्दल अंध धर्मभक्तांनीं त्याला दगडांनीं ठेचून मारलें. दुर्दैव विचाऱ्यांचें कीं ब्रूनोला ते मारूं शकले परंतु त्यानें सांगितलेल्या सत्याला ते ठार करूं शकले नाहींत ! त्यामुळें बुद्धिप्रामाण्यवादावरील लोकांचा विश्वास दृढावत गेला आणि त्याच्या पोटीं पुढें स्वातंत्र्याचा विकास झाला.

या तिन्हीं क्षेत्रांप्रमाणें काव्याच्या प्रांतांतहि ‘ रोमॅन्टिसिझम् ’ च्या कांहीं पुरस्कर्त्यांनीं स्वातंत्र्याची महती गाइली. सामाजिक बंधनांमुळें सामान्य माणसांचा जीव गांजून गेला होता. त्यांना त्या जीवनाचा जाच असह्य झाला होता. ती परिस्थिति बदलून टाकण्याचें सामर्थ्य त्या कवींमध्यें नव्हतें. परंतु नव्या स्वातंत्र्यपूर्ण समाज-जीवनासाठीं त्यांचा जीव भुकेला होता. त्यामुळें आपल्या प्रतिभेच्या साहाय्यानें त्यांनीं उंच कल्पनासृष्टींत उड्डाण केलें आणि तेथें मनोहर, सर्व स्वातंत्र्यांनीं नटलेलें असें जीवन उभें केलें. शेली या थोर कवीनें आपल्याकडे या वर्गाचें नेतृत्व घेतलें होतें.

### व्यापारी वर्गाचें व्यक्तिस्वातंत्र्य

मध्य-युगापासून एकोणिसाव्या शतकापर्यंत स्वातंत्र्याचा झगडा कुठल्या ना कुठल्या स्वरूपांत चालूंच होता. परंतु नंतर मात्र या तत्त्वज्ञानाला एक फार मोठा विचारवंत लाभला आणि त्यानें या स्वातंत्र्याचीं कांहीं शाश्वत मूल्यें ग्रंथस्वरूपांत चिरंजीव करून टाकलीं. १९ व्या शतकांतील व्यक्ति-स्वातंत्र्य म्हणजे व्यापारी वर्गाचें अथवा बाल्यावस्थेंत असलेल्या भांडवलदारांचें स्वातंत्र्य होय ! १९ व्या शतकाच्या पूर्वार्धापर्यंत मध्ययुगीन सरंजामशाहीचा अंत झाला होता आणि तिच्या विनाशांतूनच भांडवलशाहीचा उगम झालेला होता. त्याच वेळीं इंग्लंडमध्यें औद्योगिक क्रांति होऊन तेथील जीवनामध्यें प्रचंड उलथापालथ झाली. नव्या शोधामुळें व्यापारी वर्गाला अफाट असें कर्तृत्व-क्षेत्र मोकळें झालें होतें. दर्यापार जाऊन तेथें व्यापार करण्याची शक्यता निर्माण झाली होती. मोठमोठ्या प्रमाणावर त्यांनीं कारखाने काढून त्यांमध्यें भांडवल गुंतविण्यास सुरुवात केली. प्रचंड प्रमाणावर मालाचें उत्पादन सुरू केलें. त्यासाठीं त्यांनीं चोवीस तास आपले कारखाने चालूं ठेवण्यास प्रारंभ केला. सरकारची ढवळाढवळ अशा वेळीं आपल्या कामांत नको असें वाटणें साहजिक होतें. आयात-निर्यात व्यापारावरील बंधनें, मजुरांच्या कामांचे तास इत्यादि प्रश्न सोडविण्यास आम्ही स्वतंत्र आहोंत असा त्यांनीं मुद्दा उपस्थित केला. या कल्पनेच्या जोरावर ८–८ वर्षांच्या कोवळ्या पोरापासून ते ६० वर्षांच्या वृद्ध स्त्री-पुरुषांपर्यंत सर्वांना चौदा चौदा तास कारखान्यांत राबवून घ्यायला सुरवात केली. त्यामुळें लोकांच्या आयुर्मानावर देखील अनिष्ट परिणाम होऊं लागले.

या व्यापारी वर्गाच्या अनिर्बंध स्वातंत्र्याचें तात्त्विक अधिष्ठान मिल या राज्यशास्त्रज्ञाच्या व्यक्ति-स्वातंत्र्य-विषयक विचारांत आढळून येतें. मिलच्या व्यक्ति-स्वातंत्र्यविषयक विचारांत कांहीं अनिष्ट बाजू असली तरी त्याच्या तत्त्वज्ञानामध्यें कांहीं अविनाशी मूल्येंहि सांपडतात. म्हणूनच त्याच्या सर्वच तत्त्वज्ञानाला त्याज्य समजणें हें न्हानाच्या घाण पाण्याबरोबर अर्भकालाहि फेकून देण्यासारखें अनुचित होईल.

जॉन स्टुअर्ट मिलच्या विचारांमध्यें निर-








निराळ्या विचारांचे सूक्ष्म रंग मिसळलेले आहेत. त्यांत बेन्थॅमच्या उपयुक्ततावादाची छटा आहे. त्याचप्रमाणें त्याला जर्मनीमधील आदर्शवादाची कडा आहे. शिवाय फ्रेंच समाजवादाची सौम्य झांक त्यावर मधूनमधून दिसते. त्यामुळेंच जॉन मॅक्मूस यांनीं म्हटल्याप्रमाणें, "स्वातंत्र्याच्या हक्काची उद्दट आणि ठोकळेबाज घोषणा त्याच्यामध्यें सांपडत नाहीं किंवा बेन्थॅमचा संकुचित आणि अदूरदर्शी उपयुक्ततावादहि निर्भेळ स्वरूपांत दिसत नाहीं. या दोहोंपेक्षांहि अधिक व्यापक बैठकीवर त्याचे विचार उभारलेले आहेत."

जॉन स्टुअर्ट मिल स्वातंत्र्याच्या कल्पनेसाठीं व्यक्तीच्या जीवनाचे दोन विभाग कल्पितो. एक त्याचें खाजगी जीवन आणि दुसरें त्याचें सार्वजनिक जीवन. व्यक्तीच्या खाजगी जीवनामध्यें तो अनिर्बंध स्वातंत्र्याचा पुरस्कार करतो तर त्याच्या सामाजिक क्षेत्रामध्यें तें मर्यादित असावें असें प्रतिपादन करतो. वास्तविक या दोन्ही जीवनांच्या सीमारेषा एकमेकांमध्यें इतक्या बेमालूमपणें मिसळलेल्या असतात कीं त्यांची फारकत करणें अवघडच नव्हे तर अशक्य असतें. व्यक्तीच्या कुठल्याहि कृत्याचे परिणाम त्याच्यापुरतेच मर्यादित रहात नाहींत. ते इतर आप्तेष्टांवर आणि समाजावर कळत न कळत होतच असतात. एखाद्याला दारूचें व्यसन लागलेलें आहे, तासन् तास तो मदिरेच्या धुंदींत आहे. खरें पाहतां हा त्याचा खाजगी प्रश्न समजायला कांहीं हरकत नाहीं. परंतु त्याच्या मद्यपानाचे दुष्परिणाम त्याच्या कुटुंबियांवर तर होतातच; परंतु समाजाची देखील कर्तृत्वशक्ति तेवढ्या प्रमाणामध्यें कमी होत असते. या दृष्टीनें या प्रश्नाचें स्वरूप सामाजिक कां ठरवूं नये ? खुद्द मिलला देखील ही शंका सतावीत असावी. कारण त्यानेंच एके ठिकाणीं म्हटलें आहे : "व्यक्तीच्या या दुष्कृत्यांचे परिणाम त्याच्या कुटुंबियांप्रमाणें समाजावर झाल्यावांचून रहात नाहींत". परंतु असें असलें तरी तावडतोब पुढच्याच पानावर पुन्हां तो म्हणतो : "दारू घेतली एवढ्याच कारणास्तव एखाद्याला शिक्षा करणें रास्त होणार नाहीं. दारू पिऊन जर एखादा सैनिक वा शिपाई कामावर गेला तरच त्याला जरूर तेवढें शासन करावें."

वरील विसंगतीप्रमाणें त्याच्या विचारामध्यें आणखी एक मोठा दोष आहे. हा दोष त्याच्या विचाराच्या गर्भांतच आहे असें दिसतें. मिलनें एके ठिकाणीं म्हटलें आहे : "एखादा इसम पडक्या पुलावरून पैलतीराला जाऊं लागला तर त्याला कायद्यानें बंदी घालावी. कारण त्या अपघातांत तो मरण्याची शक्यता आहे. आणि मरावें अशी त्याची कधींच खरी इच्छा असणार नाहीं." आतां व्यक्तीची खरी इच्छा (Real Will) काय आहे हें समजून सरकारनें वागायचें ठरविलें तर मोठाच अनवस्थाप्रसंग गुदरणार आहे ! कारण व्यक्तीच्या अनेक कृत्यांमध्यें सरकारला हस्तक्षेप करतां येईल व त्यांतून पुढें हेगेलचा आदर्शवाद (Idealism) देखील उद्भवूं शकेल. त्याच्या 'खऱ्या इच्छे'चें तर्कशास्त्र अधिकच ताणलें तर त्यांतून हुकूमशाहीच निर्माण होऊं शकेल आणि म्हणून बोसॅन्केटनें एके ठिकाणीं म्हटल्याप्रमाणें "डोळसपणें तपासून न घेतां स्वीकारलेला हा व्यक्तिवाद अखेरीस हुकूमशाहीच्या दाट अरण्यामध्यें नेऊन पोहोंचविल्याशिवाय राहणार नाहीं" !

मिलनें समूहवादाला विरोध केला पण त्यासाठीं त्यानें व्यक्तिवादाचा अत्यंतिक मार्ग चोखाळला. तो व्यक्तीच्या 'self-regarding action' मध्यें खाजगी बाबींतच जास्त गुरफटून गेला. वरील टीका विचारांत घेऊन देखील मिलबाबत एक गोष्ट म्हणावीशी वाटते आणि ती म्हणजे त्यानेंच खऱ्या व्यक्तिवादाला पुष्कळ चालना दिली. व्यक्तीच्या हिताला अमूर्त आणि अव्यक्त अशा राष्ट्रपुरुषापेक्षां अधिक मानाचें स्थान आहे, हें त्यानेंच ठासून सांगितलें. एवढ्यापुरतें तरी त्याचें ऋण आजच्या व्यक्तिस्वातंत्र्याच्या पुरस्कर्त्यांना मान्य केलें पाहिजे.

### प्लेटोचें 'आदर्श राज्य'

वरील पंथाप्रमाणें दुसरा एक प्रमुख पंथ या क्षेत्रामध्यें दिसून येतो. व्यक्ति-स्वातंत्र्यासंबंधींचे त्याचेहि विचार तुलनात्मक दृष्ट्या अभ्यासण्याजोगे आहेत. या पंथामध्यें आदर्शवादी (Idealist) आणि मार्क्सवादी यांचा मुख्यत्वें समावेश होतो. प्लेटो आणि ॲरिस्टॉटल् या राज्यशास्त्रज्ञांनींच पुढील आदर्शवादी विचारवंतांच्या विचाराला घडण दिली.

प्लेटो हा लोकशाहीचा पक्का द्वेष्टा आहे. हुकूमशाहीचीं बीजें त्यानेंच अडीचहजार वर्षांपूर्वी आपल्या हातांनीं








पेरून ठेवलेलीं आहेत, असा त्याच्यावर अनेक वेळां हल्ला केला जातो, त्यामध्यें फार तथ्य आहे यांत शंका नाहीं. परंतु केवळ अशी कडवट टीका करण्यांत त्याच्यावर अन्याय होतो असें वाटतें. कुठलाहि विचारवंत हा त्याच्या भौतिक परिस्थितींतून जन्माला आलेला असतो आणि त्याच्या आसपास घडणाऱ्या गोष्टींतूनच कित्येक वेळां त्याच्या विचारांची बैठक ठरविली जाते. या दृष्टीनें प्लेटोच्या लोकशाही–विद्वेषाचा अर्थ समजावून घेणें मोठें बोधप्रद ठरणार आहे. लोकशाही संबंधींचा त्याचा तिरस्कार शिगेला पोहोंचावा याला सबळ कारणें त्यावेळीं घडलेली होतीं. एक तर ज्या श्रेष्ठ पुरुषाबद्दल त्याच्या मनांत अमर्याद पूज्य भाव होता त्या त्याच्या पूज्य गुरूला–सॉक्रेटिसाला याच लोकशाहीनें विषाचा प्याला प्यावयास दिला होता ! लोकांना ज्यानें ज्ञान दिलें; श्रेष्ठ मूल्यें दिलीं त्याची परतफेड म्हणून जनतेनें त्याला विषाचा प्याला दिला ! दुसरें म्हणजे अथेन्सचें सारें वैभव त्यानें पाहिलेलें होतें. तें त्याच्या मनावर कायमचें ठसलें होतें. त्या अथेन्सचा पाडाव आणि नाश हा लोकशाहीमुळेंच झाला असें त्याला वाटत होतें. आणि तिसरें म्हणजे ज्या अमीर–उमरावी घराण्यांत त्याचा जन्म झाला होता आणि बालपण गेलें होतें, त्या वातावरणांत लोकशाहीबद्दलचें प्रेम अंकुरित होऊंच शकलें नसतें. या घटनांचा परिणाम प्लेटोवरच काय परंतु इतर कोणत्याहि विचारवंतावर झाल्यावाचून राहिला नसता. आणि म्हणून त्याच्या विचाराचा अभ्यास करतांना तो या दृष्टिकोणांतून होणें जरूर आहे.

कुठल्याहि राज्याच्या सुरक्षिततेसाठीं सत्तेचें भरपूर केंद्रीकरण झालें पाहिजें असें प्लेटोचें मत होतें. यांतच व्यक्ति-स्वातंत्र्याला जगण्यास वाव आहे असें त्याला वाटत होतें. या त्याच्या विचारामुळेंच लोकशाही पद्धति त्यानें टाकावू ठरविली. कारण सत्तेचें विभजन हा तर लोकशाहीचा गाभा आहे. सत्ता थोड्यांच्या हातांत सुपूर्त करावी. मात्र त्या व्यक्ती स्वभावतः तत्त्वचिंतक किंवा विचारी पुरुष असावेत. हीच तत्त्ववेत्त्या राजा- ( Philosopher - king )ची कल्पना त्यानें 'Republic' मध्यें मांडलेली आहे. यासाठीं समाजामध्यें त्यानें तीन वर्ग कल्पिले. पहिला वर्ग राज्यकर्त्यां-(Guardians), चा दुसरा वर्ग योद्ध्यांचा आणि तिसरा वर्ग हा सामान्य जनतेचा. त्या वेळच्या धार्मिक समजुतीप्रमाणें ते अनुक्रमें सोनें, चांदी आणि लोखंड यांचे घडविलेले असत. यापैकीं राज्यकर्ते हेच त्याच्या दृष्टीनें अत्यंत श्रेष्ठ पुरुष होत. त्यांच्याच चरणीं समाजांतल्या सर्व सत्तेनें, प्रतिष्ठेनें लोळण घेतली पाहिजे. त्यांच्याच साठीं त्यानें पैशाचा आणि स्त्रियांचा समतावाद ( Communism ) प्रतिपादन केला, समाजांतील कुठल्याहि मालमत्तेचा वा स्त्रीचा उपभोग घेण्याचें स्वातंत्र्य त्यांना बहाल करून टाकलें.

या राज्यकर्त्यांची निवड करतांना प्लेटोनें कांहीं सूचना पुढें मांडलेल्या आहेत. हीं मुलें वंशपरंपरेनुसार घ्यावींत असें त्यानें म्हटलेलें नाहीं. त्यांच्या बुद्धीच्या ऐपतीप्रमाणें त्यांचा समावेश केला जावा. परंतु प्रत्यक्षांत मात्र याचा परिणाम पूर्वींच्या राज्यकर्त्यांचीं मुलें सत्ताधारी म्हणून निवडलीं जाण्याचाच संभव आहे. कारण त्यांना अनुकूल वातावरणाचा जन्मल्यापासूनच फायदा मिळत असे. एकदां राज्यकर्ते म्हणून या मुलांची निवड केली म्हणजे त्यांच्या शिक्षणाची आणि विकासाची एक योजना आंखलेली असे. त्यामुळें त्यांचें जीवन इतकें सांचेबंद, शिस्तबद्ध होऊन जाई कीं त्यांच्या मनास स्वतंत्र इच्छेचा अंकुर फुटणेंच शक्य नव्हतें. त्यांच्या बालपणापासून ते मृत्यूपर्यंत सर्व क्रिया यंत्राप्रमाणें त्यांच्याकडून करवून घेतल्या जात.

या प्लेटोच्या 'तत्त्ववेत्त्या राजा'च्या कल्पनेंत मुख्यतः दोन दोष होतेः एक तर अशी निवड करतांना ती अचूकपणें करणें मुष्कील आहे. बालपणांत त्यांच्या सहज प्रवृत्ती स्पष्टपणें व्यक्त होतीलच असें नाहीं. यामुळें गुणी आणि बुद्धिमान् मुलें योद्ध्यांच्या वर्गांत ढकलून देण्याची शक्यता आहे. दुसरें म्हणजे अशीं मुलें बुद्धीनें मोठीं असलीं तरी सद्हेतूनें प्रेरित होऊन ते पुढें जनहित साधतीलच असें म्हणवत नाहीं. सत्तास्पर्धा आणि स्वार्थांधता यामुळें त्यांची बुद्धि भ्रष्ट होणें शक्य आहे. बर्ट्रंड रसेल यांनीं आपल्या एका ग्रंथांत ही शका व्यक्त केलेली आहे. ते म्हणतात : "But in matters of government, it is difficult to know who has the most skill and very far from certain that a politician will use his skill in the public








interest rather than in his own or in that of his class or party or creed" ('History of Western Philosophy' - Page 135). हे दोन धोके तर प्लेटोच्या राज्यामध्यें आहेतच. याशिवायहि एक तिसरें धोक्याचें महत्त्वाचें स्थळ आहे. प्लेटोच्या वरील व्यवस्थेमुळें समाज कसाबसा जगूं शकेल. परंतु त्याच्या राज्यांत सांस्कृतिक विकासाची कांहींतरी शक्यता आहे काय ? कारण योद्‍धे आणि सामान्य नागरिक यांचा कलेशीं वा वाङ्मयाशीं यत्किंचित्‌हि संबंध येणार नाहीं. संबंध येणार तो फक्त राज्यकर्त्यांचा. परंतु त्यांचें जीवन अशा शिस्तींत वाढविलेलें असणार कीं त्यांच्या सर्जनशक्ती त्यांमध्यें गुदमरून मरून जाव्या. कलेला आणि उच्च संस्कृतीला पारखें झालेल्या या 'प्रजासत्ताक राज्या'चें आकर्षण आज कोणाला वाटेल असें वाटत नाहीं. आणि अशा वातावरणांत व्यक्तिस्वातंत्र्य तग धरून राहणें तरी शक्य आहे काय ?

प्लेटोनें आपल्या 'Republic' मध्यें सत्तेच्या केंद्रीकरणाचा पुरस्कार केला आणि ती सत्ता मूठभर व्यक्तींच्या हातांत सुपूर्त केली यांतच व्यक्ति-स्वातंत्र्याच्या विनाशाचीं बीजें पेरलीं गेलीं.

## हेगेलचें 'सार्वभौम राज्य'

प्लेटोच्या या विचाराचा अंगीकार निरनिराळ्या शतकांत निरनिराळ्या तत्त्ववेत्त्यांनीं केला. परंतु त्याचा मुख्य आविष्कार हेगेलनेंच एकोणिसाव्या शतकांत केला. हेगेलनें आपला 'आदर्शवाद' जोमानें पुढें मांडला. प्लेटोच्या सत्ताकेंद्रीकरणाच्या विचारानें हेगेलच्या मनाची विलक्षण पकड घेतली होती. व्यक्ती या स्वतःसाठीं नसतात. त्यांनीं समाजासाठींच जगलें पाहिजे आणि समाजासाठींच देह ठेवला पाहिजे या प्लेटोच्या विचारानें त्याला भुरळ घातली होती. आणि दुसरें म्हणजे युरोपांत फ्रेंच राज्यक्रांति होऊन पुढें तींतून नेपोलिअनसारखा पुरुष जन्माला आला होता. त्याच्याविरुद्ध युरोपमध्यें असंतोषाची लाट उसळली होती. नेपोलिअनशीं सामना करायचा तर 'राष्ट्र म्हणजे एक करारनामा' आहे, असें म्हणून चालण्यासारखें नव्हतें. त्यासाठीं बलशाली, संघटित राष्ट्र निर्माण होणें जरूर होतें. हीच त्या काळची सामाजिक गरज हेगेलनें आपल्या आदर्शवादानें भरून काढण्याचा प्रयत्न केला.

हेगेलच्या आदर्शवादाप्रमाणें राष्ट्र ही एक अमूर्त दिव्य शक्ति आहे. या दैवी शक्तीच्या हातून कांहींहि चुकीचें वा अन्यायाचें घडूंच शकत नाहीं. कारण नीतिशास्त्र आणि समाजशास्त्र हीं तिला चांगलीं अवगत असतात. व्यक्तीच्या अंतर्मनाचे व्यापार या दैवी शक्तीला समजतात. त्याबरोबर व्यक्तीच्या बाह्य हालचालींचा अर्थहि तिला समजतो. राष्ट्रामुळेंच लोकांना शांततेचा लाभ होतो व स्वतःचा विकास करून घ्यायला अवसर मिळतो. राष्ट्रांच्या मागें ही जी अद्‍भुत शक्ति आहे, तिचें सामर्थ्य असामान्य आहे. ती शक्ति जर वावरत नसती तर माणूस आत्मकेंद्री बनला असता व समाज विस्कळित झाला असता. म्हणून या अव्यक्त दैवी राष्ट्रपुरुषाच्या चरणावर सर्वांनीं आपल्या प्राणांचें अर्घ्य द्यावयाचें असतें. राष्ट्र ही एक स्वयंनियंत्रित शक्ति आहे यावर हेगेलचा मुख्य भर आहे : "State is self-knowing and self-actualising individual'. 'State is self-conscious ethical substance'– अशा शक्तीच्या पुढें व्यक्तीनें स्वतःच्या बुद्धि-स्वातंत्र्याची पताका उभारणें म्हणजे त्या शक्तीचा अवमान होय. कारण व्यक्ति कितीहि श्रेष्ठ असली तरी ती या शक्तीपेक्षां मोठी होऊं शकत नाहीं.

हेगेलच्या या आदर्शवादांतच हुकूमशाहीचीं बीजें खेचून भरलेलीं आहेत. राष्ट्रामध्यें त्याला अतिमानवी शक्तीचा साक्षात्कार झाला व त्यानें राष्ट्राला अमर्याद सत्ता अर्पण केली. प्रत्यक्षांत या विचाराचे परिणाम हुकूमशाहीला पोषक झाले. राष्ट्र म्हणजे अखेरीस त्याच्या नांवावर कारभार हांकणारें कांहीं थोड्या लोकांचें मंडळ; या दृष्टीनें राष्ट्राची अनिर्बंध सत्ता म्हणजे या थोड्या पुरुषांची अमाप सत्ता होय. जर्मन राष्ट्राची सत्ता म्हणजे अखेरीस हिट्लर या एका व्यक्तीचीच अमर्याद सत्ता होऊन बसते. प्रा. लास्की यांनीं 'State in Theory and Practice' मध्यें हा मुद्दा विस्तारानें मांडलेला आहे. बर्ट्रांड रसेल आणि मानवेंद्रनाथ रॉय या विचारवंतांनीं याच मुद्द्यावर आपल्या लेखांतून आणि ग्रंथांतून भर दिलेला आहे.

हेगेलच्या या विचारामुळें राष्ट्राचें सार्वभौमत्व आंतरराष्ट्रीय राजकारणांत देखील अबाधित राखलें

गेलें. त्यामुळें जागतिक शांतता धोक्यांत आली व जागतिक युद्धाची शक्यता निर्माण झाली. बर्ट्रांड रसेल यांनीं हेगेलच्या या विचाराचें स्वरूप आपल्या 'The History of Western Philosophy' या ग्रंथामध्यें चांगल्या रीतीनें दर्शविलें आहे. ते म्हणतातः "When each State, in relation to its subjects, is made as absolute as Hegel makes it, there is difficulty in finding any philosophical principle by which to regulate the relations between States" (Page 767). – अर्थात् यांतून जागतिक युद्धें अटळ होतात. परंतु हेगेलला त्याबद्दल कांहींच खेद होत नाहीं. उलट अशा युद्धांतून राष्ट्राच्या सार्वभौमत्वाचा जगाला प्रत्यय येत असतो असें त्यानें म्हटलें आहे : "The state of war shows the omnipotence of the State in its individuality" हें त्याचें आवडतें तत्त्व आहे. अशा तऱ्हेनें सदा सर्वकाळ जर युद्धाच्या घोषणा होऊं लागल्या तर मग व्यक्ति-स्वातंत्र्याची चिंता करण्याचें काय कारण ?

हेगेलच्या या मताचा आग्रह थोड्याफार फरकानें कान्ट, बोसॅन्केट ग्रीन आदि राज्यशास्त्रज्ञांनीं धरलेला आहे.

## मार्क्सवाद्यांची व्यक्तिस्वातंत्र्याची कल्पना

आदर्शवादी पंथाशिवाय दुसरा एक मार्क्सवाद्यांचा पंथ या क्षेत्रामध्यें वावरत असतो. त्यांच्या मतें तेच खरे व्यक्तिस्वातंत्र्याचे रक्षक आहेत. इतर भांडवलवादी राष्ट्रांमध्यें उत्पादनाचीं सारीं साधनें धनिकांच्या हातांत असतात आणि जेथें उत्पादनाची सारी सत्ता केंद्रित झालेली असते तेथेंच समाजांतील सारी सत्ता गोळा झालेली असते. म्हणून सगळ्या भांडवलशाही राष्ट्रांमध्यें अंतिम सत्ता ही धनपतींच्या हातांतच एकत्रित झालेली असते. इतर जनतेला राजकीय समता दिलेली असते. परंतु आर्थिक समतेपासून फारकत झालेली राजकीय समता ही फसवी आणि आभासात्मक असते. आणि भांडवलशाही राष्ट्रें कितीहि व्यक्तिस्वातंत्र्याचा पुकारा करीत असलीं तरी त्या राष्ट्रांमधून व्यक्तिस्वातंत्र्य अभावानेंच तळपत असतें ! उलट, समाजवादी व्यवस्थेमध्यें उत्पादनाच्या साधनांचें राष्ट्रीयीकरण झालेलें असतें, खाजगी मालमत्ता नष्ट केलेली असते. राष्ट्र हेंच सर्वांच्या हिताची काळजी वाहत असते. तेथें सर्वांना आर्थिक स्थैर्याची शाश्वती असते. आणि त्याचबरोबर राजकीय समता देखील घटनेनें जाहीर केलेली असते. जेथें राजकीय समतेबरोबर आर्थिक समता देखील गळ्यांत गळा घालून वावरत असते, तेथेंच व्यक्ति-स्वातंत्र्याचें खऱ्या अर्थानें जतन होत असतें, असा मार्क्सवाद्यांच्या म्हणण्याचा सारांश आहे. अशा राज्यामध्यें स्वयंपाकघरांतील गुलामगिरी नाहींशी झालेली असते. किसान-मजदूर यांची पिळवणूक कायद्यानें बंद झालेली असते. अशा समाजामध्यें व्यक्ति-स्वातंत्र्याचें मनोहर दर्शन घडणें स्वाभाविक आहे. तेथें समाज व्यक्तीच्या हिताची धुरा वाहत असल्यामुळें इतर ठिकाणांप्रमाणें राष्ट्र – विरुद्ध – व्यक्ति किंवा समष्टि – विरुद्ध – व्यक्ति असला वाद उपस्थित होत नाहीं. तेथें अशा तऱ्हेचें वर्गीकरण करणेंच चूक आहे. कारण व्यक्ति आणि समाज यांचें जीवन परस्परांशीं समरस झालेलें असतें. स्टालिननें हाच विचार एके ठिकाणीं मांडलेला आहे. तो म्हणतोः " There is no, nor should there be, irreconcilable contrast between the individual and the collective, bteween the interests of individual person and the interests of the collective. There should be no such contrast, because collectivism, socialism does not deny, but combines individual interest with the interest of the collective ". (Marxism vs. Liberalism, Page 10).

मार्क्सवाद्यांचा व्यक्तिस्वातंत्र्याविषयीं पुकारा करणारा वरील युक्तिवाद किती पोकळ आहे हें विचारवंतांच्या लक्षांत येऊन चुकलें आहे. प्रत्यक्ष वस्तुस्थितीहि अगदीं निराळी आहे. आतांपर्यंत त्या 'पोलादी पड्या'च्या आंत कोणालाहि डोकावतां येत नव्हतें. परंतु अलीकडे हा 'पोलादी' पडदा बराच झिरझिरीत झाला असून आंतमध्यें किलकिल्या डोळ्यांनी पाहणें शक्य झालें आहे. तेथें आंत-



अनुक्रमणिका






मध्यें डोकावल्यानंतर कोणालाहि हुकूमशाहीच्या टांचखालीं चिरडल्या जाणाऱ्या व्यक्ति-स्वातंत्र्याचें मूक आक्रंदन ऐकूं आल्याशिवाय रहात नाहीं. कलावंतांची, कवींची प्रतिभा, लेखकांची सर्जनशील शक्ति आणि विचारवंतांची प्रज्ञा आज तेथें बंदिस्त पडलेली आहे. तेथें व्यक्ति-स्वातंत्र्याची भाषा बोलणें म्हणजे दैवाचा मोठा निष्ठुर विनोद आहे असें वाटतें.

मार्क्सवाद्यांच्या जगांत व्यक्ति-स्वातंत्र्याला ग्रहण लागलें आहे. याबाबत विचारवंतांत सहसा मतभेद आढळत नाहीं. परंतु त्याची कारणमीमांसा मात्र आतांपर्यंत अनेकांनीं अनेक पद्धतींनीं केली आहे. कांहींना वाटतें, या हुकूमशाहीचें मूळ बीज त्यांच्या मार्क्सवादी तत्त्वज्ञानांतच आढळून येतें. मजुरांच्या हातांत उत्पादनाच्या साधनांचें केंद्रीकरण करण्याचे विचार त्यांनीं मांडले आणि त्याचा अपरिहार्य परिपाक म्हणूनच ही हुकूमशाही तेथें प्रविष्ट झाली. इतर कांहीं विचारवंतांना वाटतें कीं हा दोष मार्क्सच्या विचारांचा नसून तो लेनिन या संघटकाचा आहे. त्यानें मजूरांचा पक्ष स्थापन केला; क्रांति करून सत्तेचीं सूत्रें आपल्या हातांत घेतलीं. परंतु पुढें सत्तेचें विभजन न करतां त्यानें ती तशीच केंद्रित ठेवली. त्यामुळें लेनिन हाच या परिपाकाचा धनी आहे. – विचारवंतांचा आणखी एक गट आहे. त्याच्या मतें या दोषांचें खापर मार्क्स किंवा लेनिन यांच्यावर फोडणें म्हणजे निष्कारण त्यांच्यावर अन्याय करणें होय. खरी परिस्थिति अशी आहे कीं त्या देशाला गेल्या अनेक वर्षांत लोकशाहीची परंपरा कधींच लाभलेली नाहीं. सुलतानी कारभारच आतांपर्यंत तेथें चालत आला. अशा देशामध्यें लोकशाहीचें रोपटें मूळ धरूं शकतें तरच आश्चर्य! दोष जातो तो तेथील वातावरणाला आणि परंपरेला, कोणत्याहि व्यक्तीला नव्हे! या शिवाय आणखी एक चवथा पंथ आहे. त्याचें म्हणणें असें कीं स्टालिन हाच खरा या दुःखान्तिकेला जबाबदार आहे. स्टॅलिनच्या अधिकारलालसेमुळें लोकशाहीचा महान् प्रयोग त्या देशामध्यें फसला व हुकूमशाहीचें हें नवें प्रहसन सुरूं झालें.

या निरनिराळ्या विद्वानांची हीं मतें कांहींशीं एकांतिक असतील. कदाचित् त्यांनीं सांगितलेल्या सर्व गोष्टींचा साकल्यानें झालेला परिणाम म्हणजे देखील आजची तेथील हुकूमशाही असेल. परंतु या बाबतींत कुठल्याहि व्यक्तीला जबाबदार धरण्याऐवजीं मूळ तत्त्वज्ञानांतच त्याचीं कारण शोधून काढणें अधिक उचित होईल असें वाटतें.

## शेवटीं अल्पसंख्यच सत्ताधारी !

मार्क्सनें आपला जाहीरनामा १८४८ सालीं प्रसिद्ध करून जगाच्या विचारांत प्रचंड उलथापालथ केली. कामगारराज्याचें सुंदर स्वप्न त्यानें त्यामध्यें चितारलें. समाजांतील पुंजीपतींच [illegible] अधिकार काढून घेऊन ते कामगारांच्या हातांत देण्याचा अट्टहास धरला. उत्पादनाचीं साधनें त्यानें कामगारांच्या मालकीचीं करण्याची घोषणा केली. आपल्या या ध्येयाची पूर्ति कशा तऱ्हेनें व्हावी यासंबंधीं तो आपल्या जाहीरनाम्यांत म्हणतो : 'आपल्या राजकीय सत्तेच्या जोरावर कामगार वर्ग हळुहळुं धनिक वर्गाकडून सर्व भांडवल काढून घेईल व शेवटीं राष्ट्राच्या हातांत उत्पादनाचीं सर्व साधनें केंद्रित केलीं जातील' या त्याच्या एका वाक्यामध्यें व्यक्ति-स्वातंत्र्याचा सारा भावी इतिहास लिहिला गेला असें वाटतें. यामध्यें मार्क्सनें दोन गोष्टींचा पुकारा केला : एक तर उत्पादनाच्या साधनांचें केंद्रीकरण होईल आणि दुसरें म्हणजे तें राष्ट्राच्या हातांमध्यें केल जाईल.

आजपर्यंतच्या अनुभवावरून हें अनेक वेळां सिद्ध झालें आहे कीं आर्थिक सत्तेचें केंद्रीकरण आणि समाजांतील व्यक्ति-स्वातंत्र्य एकत्र नांदूं शकत नाहींत. कारण एका थोर पंडितानें म्हटल्याप्रमाणें "उत्पादनाच्या साधनांवरील ताबेदारी म्हणजे अखेरीस मानवांच्या जीवितावरीलच ताबेदारी होऊन बसत असते". व्यक्ति-स्वातंत्र्याला कसल्याहि प्रकारच्या सत्तेच्या केंद्रीकरणाचें वावडें असतें. या दृष्टीनें मार्क्सनें व्यक्ति-स्वातंत्र्याला पहिला धक्का दिला. आणि दुसरा धोका पोहोंचला तो त्याच्या राष्ट्राच्या मालकी हक्कानें. कारण राष्ट्र हें ग्रंथामध्यें कांहींहि मानलेलें असलें, तरी प्रत्यक्षांत मात्र तें कांहीं ठराविक व्यक्तींचें अधिकारी मंडळच असतें. कारण राज्याचीं सूत्रें राष्ट्र नांवाची अव्यक्त, अमूर्त अशी कोणी व्यक्ति चालवीत नाहीं. तीं कोणाच्या तरी हातीं स्वाधीन करावींच लागतात. म्हणजे पर्यायानें राष्ट्र म्हणजे अखेरीस कांहीं वेंचक लोकच होऊन बसतात. बर्ट्रंड रसेल हे आपल्या 'Authority and the Individual'







मध्यें म्हणतात : "राष्ट्राचा आपण संदिग्धपणें नव्हे तर प्रत्यक्षांत विचार करूं लागतों तेव्हां आपणांस असें दिसून येतें कीं सत्तेचा फार मोठा वांटा हा अल्पसंख्य लोकांच्याच हातांत पडलेला असतो आणि म्हणून राष्ट्राचें वैभव म्हणजे अखेरीस या सत्ताधारी अल्पसंख्य लोकांचेंच वैभव होय." प्रा. लास्की यांनीं हाच मुद्दा आपल्या लिखाणांतून आग्रहानें प्रतिपादन केला आहे. मार्क्सवादावरील ही टीका जर खरी असेल तर असें म्हणणें प्राप्त आहे कीं व्यक्ति-स्वातंत्र्याच्या विनाशाचीं बीज मार्क्सच्या तत्त्वज्ञानांतच आहेत आणि त्या मार्गानें गेल्यास स्वातंत्र्याची प्राप्ति होणें सर्वथा अशक्य आहे.

आदर्शवाद्यांनीं वा मार्क्सवाद्यांनीं व्यक्तिविकासाची थोर महत्त्वाकांक्षा मनाशीं बाळगली परंतु अखेरीस ते पोहोंचले ते मात्र हुकूमशाहीच्या मुक्कामाला. या वर्गानें समूहवादावर आत्यंतिक भर दिला आणि व्यक्तींना अगदीं क्षुद्र लेखलें. उलट, एपिक्युरस, मिल यांनीं 'असंघटित व्यक्तिवादा'ला अवास्तव महत्त्व दिलें आणि समाजाकडे अक्षम्य दुर्लक्ष केलें. त्यांच्या वाटेनें जर आपण गेलों तर सामाजिक स्थैर्य धोक्यांत येईल, समाज विस्कळित बनून दुबळा बनेल व व्यक्तींना अस्थिर समाजजीवनाचा शाप भोगावा लागेल. व्यक्तींना समाजसंस्थेंत केव्हांहि मध्यवर्ती, केंद्रगामी स्थान असायला हवें. सूर्यमालेमध्यें सूर्याचें जें मध्यवर्ती स्थान तेंच व्यक्तीचें सर्व शासनसंस्थेमध्यें असायला हवें. परंतु या मार्गानें गेलें तर हें ध्येय हस्तगत होणें तर राहोच, समाजच असंघटित होऊन अव्यवस्था आणि गोंधळ यामध्यें फेंकला जाईल. एकूण ही शृंगापत्ति टाळणें मोठें मुष्किल होऊन बसलें आहे. व्यक्तिस्वातंत्र्य अबाधित राहून समाज सुसंघटित कसा होईल हीच आजच्या मानवासमोरील सर्वांत मोठी समस्या आहे.

## संध्याकाळचें — !

संध्याकाळचें
काम संपवून
पोंचतां घरीं
सहज कधीं
खुषींत येऊन,
आरामखुर्चीत
स्वस्थ पडून
शिलगावितों
उंची सिगारेट.
अधूनमधून
दमदारसा
झुरका मारून
धूम्रपानाची
चाखीत लज्जत
रमतों पाहून
वेडींवांकडीं
धूम्रवलयें
स्वैर हवेंत
तरंगणारीं.

पांचच मिनिटें
टिकून उरतो
माझा आनंद.
जळते पुरती
सिगारेट, नि —
जमीनीवर
सांडते राख
— आणि नेमकीं
याच वेळेला
माझ्या डोक्यांत
विचारचक्रें
जोरजोरानें
फिरूं लागतीं !
ओरडूं लागतें
एकसारखें
आंतून अंतर :
"तुझ्या जीवनाची
अखंड जळती
उंची सिगारेट
ओढल्याविण

चालली जळून !
कुणीं सांगावें !
न कळतांच
जाईलहि ती
पूर्ण विझून ;
म्हणून आतां
एकच घेई
दमदारसा
झुरका मारून,
आणि भोगून
एकदांच तो
दुर्मिळ असा
जीवनानंद.
उघडीं लोचन
समोर पहा —
क्षणाक्षणाला
झडते राख
काळाच्या विशाल
रक्षापात्रांत"

— शंकर रामाणी








# 'वृक्षाचेंहि पान हाले,– त्याची सत्ता!'

**गांधीजींची** हत्या व्हावयाच्या आधीं कितीतरीं वर्षे –१६ जून १९४०–महादेवभाई देसाई यांचें मला एक पत्र आलें होतें. त्यांत त्यांनीं लॉर्ड लिन्लिथगोच्या खाजगी चिटणीसाकडून आलेल्या पत्राचा उल्लेख केला होता. ब्रिटिशांचे मारेकरी गांधीजींना ठार मारण्याचा प्रयत्न करणार आहेत असा प्रचार जर्मन आकाशवाणी करीत होती. ब्रिटिशांच्यावर आळ यावा म्हणून जर्मनांचे हस्तकच कदाचित् तसा यत्न करतील अशी लिन्लिथगोला शंका आल्यावरून त्यांनीं गांधीजींना संरक्षकांचें साहाय्य देऊं केलें होतें. अशा साहाय्याला गांधीजींनीं नकार दिला. "आजवर अनेक वर्षे मी संभाव्य घातपाताच्या छायेंत वावरलों आहे आणि ईश्वराच्या इच्छेशिवाय तृणाचें पातेंहि हालूं शकत नाहीं अशी आजवरच्या माझ्या अनुभवानें माझी दृढ श्रद्धा झालेली आहे" असें गांधीजींनीं सांगितलें. "कोणी घात करण्याचा प्रयत्न केला म्हणून घात होत नाहीं व घात व्हावयाचाच असला तर कोणीहि मित्र त्यांपासून वांचवूं शकत नाहीं" असेंहि ते म्हणाले. महादेवभाईनीं पत्रांत जवळजवळ गांधीजींचीं वाक्येंच उद्धृत केलीं होतीं.

यानंतर **जानेवारी १९४८**! गांधीजींच्यावर बॉंब टाकण्याचा प्रयत्न फसल्यानंतर त्यांच्या संरक्षणासाठीं कडेकोट बंदोबस्त करण्यांत आला. बिर्ला हाउसमध्यें प्रत्येक कानाकोपऱ्यांत संरक्षक व साध्या वेषांतील सशस्त्र पोलीस वावरूं लागले. हा कडेकोट बंदोबस्त पाहून मी थोडासा अस्वस्थच झालों. १९१३ मध्यें लॉर्ड हार्डिंजवर बॉंब पडल्यानंतर त्याच्या संरक्षणासाठीं असाच कडेकोट बंदोबस्त करण्यांत आला होता. त्यावेळीं लॉर्ड हार्डिंजच्या सुरक्षाव्यवस्थेविषयीं 'तो जिवंत असुनी मेला' अशी गांधीजींनीं हेटाळणी केली होती. गांधीजींच्या या उद्गारांची मी त्यांना आठवण करून दिली. मी त्यांना विचारलें: "आपल्या प्रार्थनादेखील सशस्त्र पहाऱ्यांत व्हाव्यात ही गोष्ट आपल्याला ओंगळ वाटत नाहीं काय? आपल्या प्राणांचें मोल मला समजतें परंतु आपल्या कीर्तीचें मोल मला त्याहूनहि अधिक वाटतें. व्यक्तिगत संरक्षणासाठीं केल्या जाणाऱ्या प्रयत्नांचा आजन्म उपहास करणारे आपण या गोष्टी चालूं तरी कशा देतां?". गांधीजींनीं हें सारें मान्य केलें आणि ते म्हणाले: "वल्लभभाईंना विचारून या सर्व योजनेच्या मागें कोण आहे याचा तपास करा. मलाहि ही सर्व व्यवस्था आवडत नाहीं. परंतु मला हें सारें सहन करावें लागत आहे. माझ्या रक्षणासाठीं नव्हे तर सरकारवर ठपका येऊं नये म्हणून!"

त्यानंतर मी वल्लभभाईंशीं याविषयीं बोलणें काढलें. आपल्या नेहमींच्या तुटक पद्धतीनें त्यांनीं उत्तर दिलें: "ही नसती पंचाईत तुम्हाला कशाला? हें तुमचें काम नव्हे. यांत तुमचा संबंध नाहीं. ही माझी जबाबदारी आहे. केवळ माझ्यावरच अवलंबून असतें तर झडती घेतल्याखेरीज एक माणूसहि मी बिर्लाहाऊसमध्यें आंत सोडला नसता. परंतु बापू तशी परवानगी देत नाहींत!" –शेवटीं काळ आला! आणि काळ आला म्हणजे कोणीहि मित्र वांचवूं शकत नाहीं हेच गांधीजींचे उद्गार अखेर खरे ठरले! प्रार्थनेच्या वेळीं जातांना मीहि कमरेपाशीं एक पिस्तूल छपवून नेत असे व गांधीजींच्या जवळपास फिरकणाऱ्या प्रत्येक माणसावर कडक नजर ठेवीत असे. परंतु हा नुसता एक क्षुद्र अहंकार होता. "वृक्षाचेंहि पान हाले–त्याची सत्ता!" हेंच अखेरीला खरें!

**श्री. घनश्यामदास बिर्ला** यांच्या 'In the Shadow of the Mahatma' ('महात्माजींच्या साउलींत' नोव्हें. १९५३) या पुस्तकांतून अनुवादित.

## पहिल्या अणुबॉंब-हल्ल्यांत बळी पडलेल्यांची स्मृति!

गेल्या ऑक्टोबर २० ता. स अमेरिकन लष्करी खात्याच्या रोगनिदानशास्त्र –(Pathology)– संशोधनसंस्थेच्या इमारतीची कोनशिला मोठ्या समारंभानें बसविण्यांत आली. तीन मजले जमीनीखालीं व पांच मजले जमीनीवर अशी आठ मजली ही इमारत होणार असून तिच्यामधील भिंतींची रचना आणि बांधणी अशी कॉंक्रीटची मजबूत होणार आहे कीं अणुबॉंबची मात्रा या इमारतीवर बिलकूल चालणार नाहीं. जगांत जो पहिला अणुबॉंबहल्ला हिरोशिमावर झाला, त्या हल्ल्यांत अणुबॉंबस्फोटाच्या भयंकर आगींत अतिभयंकर धगीनें कोळपून गेलेल्यांपैकीं एका माणसाच्या शरीरांतील अवशिष्ट तंतू-(tissue) चा एक भाग या इमारतीच्या कोनशिलेंत बसविण्यांत आला आहे! —'**हरिजन**' (२८।११।५३ वरून)









श्री. निसिम ईझेकील – अनुवादक – तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# श्वाइट्झरचें संस्कृतिविषयक तत्त्वज्ञान

श्वाइट्झर ( Schweitzer ) हा एक विद्यमान जर्मन तत्त्वज्ञ व संत आहे. इ. स. १९३२ मध्यें 'संस्कृतीचें तत्त्वज्ञान' ( Philosophy of Civilization) या त्याच्या पुस्तकाचा प्रथम भाग इंग्लिशमध्यें अनुवादरूपानें प्रसिद्ध झाला. ह्या पहिल्या भागांत 'संस्कृतीचा अपक्षय व उद्धार' (Decay and the Restoration of Civilization ) हा विषय आला आहे. या विषयावरील अत्यंत सुलभ, गंभीर आणि प्रेरणाशील निबंधांपैकीं हा एक निबंध आहे. श्वाइट्झर हा साधा, गंभीर व प्रेरणाशक्तीनें संपन्न असलेला माणूस असून यानें आपलें जीवितहि ध्यानांत भरण्यासारखें घालविलें आहे. वयाच्या चोविसाव्या वर्षी हा तत्त्वज्ञानांत पीएच्. डी. झाला आणि नंतर लगेच दोन वर्षांनीं 'ऐतिहासिक येशूचा शोध' या विषयावर संस्मरणीय प्रबंध लिहून धर्म या विषयावरील पीएच्. डी. ही पदवी त्यानें मिळविली. त्यानंतर त्यानें सेंट् पॉलवरील दोन ग्रंथ, बाख्चें प्रमाणशुद्ध चरित्र आणि वाद्यांवरील निबंध लिहिले. युरोपांतील एक श्रेष्ठ वाद्यनिपुण म्हणून तो प्रसिद्ध आहे. शिवाय आत्मचरित्र, गटेवरील निबंध आणि भारतीय तत्त्वज्ञानाचें समालोचन हीं पुस्तकें त्यानें लिहिलीं आहेत.

ही त्याची कामागिरी महत्त्वाची आहेच. परंतु याहिपेक्षां चमत्कृतिजनक अशी गोष्ट त्याच्यासंबंधीं नमूद करण्यासारखी आहे. त्यानें तिसाव्या वर्षी वैद्यकीय शिक्षणाकरितां पुनः महाविद्यालयांत प्रवेश केला. ७ वर्षे वैद्यकीय शिक्षण घेऊन विषुववृत्तावरील फ्रेंच आफ्रिकेंत येऊन राहिला. तेथें तेव्हां एकहि डॉक्टर नव्हता. या निबिड जंगली प्रदेशांत त्यानें एक रुग्णालय भूतदयेच्या आजीव व्रतानें चालविलें आहे. समाजानें केलेल्या पापाकरितां हा स्वतः प्रायश्चित्त आचरीत आहे. तो म्हणतो : 'काळ्या माणसांवर गोऱ्या जातींनीं जे अत्याचार करून अनाचार केले, त्यांची ही निष्कृति होय.' याच ठिकाणीं संस्कृतिविषयक तत्त्वज्ञानाचा चवथा अखेरचा भाग लिहून तो पुरा करीत आहे.

आफ्रिकेंत त्यानें जे परिश्रम चालविले आहेत, त्यांची कथा मी सांगू इच्छीत नाहीं किंवा त्याचें मूल्य आणि मर्महि सांगत नाहीं. जिज्ञासूंनीं त्याकरितां त्याच्या आत्मचरित्राचे सुप्रसिद्ध चार[1] ग्रंथ वाचावेत. श्वाइट्झरच्या भारतीय तत्त्वज्ञानाच्या समालोचनाचें पुस्तक कोणीतरी भारतीयानें पुनः जरूर प्रसिद्ध करावें. त्याच्या लॅम्बरीन येथील रुग्णालयाचें सुरस चित्रण करणारें वृत्त अत्यंत सुप्रसिद्ध आहे.

---

[ डॉ. आल्बर्ट श्वाइट्झर यांना 'शांतता'विषयक नोबेल पारितोषिक मिळाल्याचें कांहीं दिवसांपूर्वी जाहीर झालें. त्या निमित्तानें डॉ. श्वाइट्झरवरील प्रस्तुत लेख वाचकांस समयोचित व उद्बोधक वाटेल. श्री. ईझेकील यांचा मूळ इंग्रजी लेख दिल्लीच्या 'Thought' या साप्ताहिकांत प्रसिद्ध झाला. प्रस्तुत अनुवाद त्यांच्या संमतीनें येथें दिला आहे -- का. सं. ]

1 Schweitzer's autobiographical volumes : *Memoirs of Childhood and Youth, My Life and Thought, From My African Notebook* and *On the Edge of the Primaeval Forest.* The publishers Adam and Charles Black, Soho Square, London. George, Allen and Unwin. *Indian Thought and its Development. The Africa of Albert Schweitzer,* published by Adam and Charles Black.

त्यानें लिहिलेलें संस्कृतीचें तत्त्वज्ञान, डॉक्टर होण्याचा त्याचा निर्धार आणि आफ्रिकेंतील त्याचें सेवेचें व्रत या तीन गोष्टींच्या संबंधांत येथें दोन मुद्दे लक्षांत ठेवले पाहिजेत. पहिला मुद्दा असा कीं, वयाच्या २१ साव्या वर्षीच तत्त्वज्ञानासंबंधीं चिंतन करण्याचा त्यानें निर्णय घेतला. वैद्यक शिकत असतांच तत्त्वज्ञानांतील महत्त्वाच्या विषयांचा अभ्यास पुरा केला. या अभ्यासांत नंतर व्यत्यय येऊं नये म्हणून त्यानें अगोदरच खबरदारी घेतली. त्याच्या विचारावर गटेच्या जीवनाचा फारच परिणाम झाला होता. गटेच्या जीवनाचें अनुकरण तो करीत आहे, हें तो विनयानें कबूल करतो. तो लिहितो : "गटेचें असें सांगणें आहे कीं, प्रत्यक्ष कामावांचून शुद्ध बौद्धिक व्यासंग करतांच येणें शक्य नाहीं. प्रत्यक्ष काम आणि बौद्धिक व्यासंग यांचा साक्षात् स्वाभाविक संबंध नसला आणि साम्य नसलें तरी या अगदीं पृथक् गोष्टींचा सांधा व्यक्तीच्या जीवनांत जुळलेला असतो." श्वाइट्झर म्हणतो कीं "डोक्यांत बौद्धिक कार्याच्या प्रचंड योजना चालत असतांच शहराच्या कारभाराचे हिशेब गटे तपासीत असे; शहराच्या सांपत्तिक उलाढालींत सुव्यवस्था निर्माण करण्याचा प्रयत्न तो करीत असे; नवे रस्ते आणि पूल तयार करण्याकरितां रेखाटलेल्या योजना तपाशीत असे; आणि प्रतिवर्षी निरुपयोगी झालेल्या खाणी पुनः सुरू कराव्या म्हणून झटत असे."

प्रत्यक्ष काम करण्याकरितां श्वाइट्झरनें आफ्रिकाच कां निवडली या संबंधीं फार थोडें सांगतां येईल. जर्मनींतील कोलमर या गांवीं मूर्तिकार बार्थोल्डि यानें आफ्रिकन् नीग्रोची तयार केलेली प्रतिमा त्याच्या लहानपणींच पाहण्यांत आली. त्या वेळीं ज्या भावना त्यानें अनुभविल्या त्यांच्यांत या गोष्टीचें मूळ आहे. हा केवळ योगायोगहि म्हणतां येईल. अशाच तऱ्हेच्या भावना चिनी जनतेच्या यातना किंवा तांबड्या इंडियनांच्या दुर्दैवाचा विपाक पाहूनहि उत्पन्न झाल्या असत्या. परंतु असें म्हणतां येतें कीं, ख्रिश्चन संस्कृतीनें आफ्रिका खंडावर जो पद्धतशीर अत्याचार केला तोच श्वाइट्झरच्या आफ्रिकेंतील चळवळीचें मूळ होय. किंवा असेंहि म्हणतां येईल कीं, सेवेच्या दृष्टीनें आफ्रिका हें अत्यंत नवें क्षेत्र आहे. अथवा काळ्यागोऱ्यांचा जो विशिष्ट संबंध तेथें आढळतो तो या सेवेचें महत्त्वाचें कारण ठरतो.

## श्वाइट्झरच्या संस्कृतिविषयक कल्पना

बाकी कांहीं कां असेना, आपणांस येथें श्वाइट्झरच्या संस्कृतिसंबंधींच्या कल्पना आणि त्याचें आधारभूत सामान्य तत्त्वज्ञान एवढ्याशींच कर्तव्य आहे. जीवनाची पूज्यता हें त्याचें तत्त्वज्ञान होय.

येथें त्याचें बाय्बलवरील लेखन आणि धर्मनिबंध संदर्भ म्हणून निर्दिष्ट केलेले नाहींत असें वाचकांनीं समजावें.

त्याच्या विचारसरणीचें सार सांगणें कठीण आहे. कारण त्यानें ती अत्यंत साररूपानें सांगितली. त्यानें आधारग्रंथ घेतले नाहींत किंवा कसलीहि सजावट केली नाहीं. तो म्हणतो : "नैतिक अधिष्ठानाशिवाय संस्कृति अस्तित्वांतच राहूं शकत नाहीं. हें अधिष्ठान तत्त्वज्ञानच निर्माण करूं शकतें. विश्वविषयक सिद्धांत रचीत असतां किंवा विश्वाचें सत्य चित्र रेखाटीत असतां त्यांतच नैतिक आदर्शाप्रत तत्त्वज्ञान येऊन पोचतें. असें नैतिक आदर्शाप्रत पोचणें हें तत्त्वज्ञानाचें अंतिम कार्य होय. हें कार्य करीत असतां तत्त्वज्ञानाला यश आलें तर जगाची प्रगति होते. अपयश आलें तर जगाचा अपक्षय होतो. परंतु वर्तमानकाळीं तत्त्वज्ञानानें अशी मौलिक विचारशक्ति गमावली आहे. तत्त्वज्ञानाचा इतिहास, हेंच स्वरूप तत्त्वज्ञानाला आलें आहे. म्हणून त्याच्यापासून सर्वत्र निश्चयात्मक बुद्धि उत्पन्न होत नाहीं. अठराव्या शतकांत याच्या उलट होत होतें. तशी परिस्थिति पुष्कळ ठिकाणीं न राहिल्यामुळें संस्कृति जगणें अशक्य होत आहे."

आज तत्त्वज्ञान विश्वविषयक सामान्य सिद्धांत सांगत नाहीं; परंतु तसा सिद्धांत तत्त्वज्ञानानें शोधलाच पाहिजे; त्या बाबतींत विश्रांति उपयोगी नाहीं; निदान नैतिक आदर्श देण्याकरितां तरी त्यानें झटलेंच पाहिजे. नैतिक आदर्शांची जी स्वाभाविक शक्ति आहे, तिचें पोषण त्यानें केलें पाहिजे. तत्त्वज्ञानानें असा सतत आग्रह धरला पाहिजे कीं, नैतिक आदर्श हे समाजाच्या बाह्य संघटनेला आवश्यक आहेतच. निरंतर चालावयाचे नैतिक प्रयत्न वर्तमानकाळांत तुरळक होत चालले आहेत. भौतिक प्रगतीच्या स्पर्धेत स्वतंत्र जीवन जगणाऱ्या माणसांची संख्या घटत चालली आहे, हें त्याचें कारण होय. मनुष्य कसा असावा, यासंबंधाची कल्पना संकुचित








होऊन गेली आहे. समाजाची बाह्य रचना हेंच सर्वस्व बनल्यामुळें व्यक्तीचें महत्त्व फार थोडें शिल्लक राहिलें आहे. अमानुषता पूर्णतेस पोचण्याला कालावधि थोडा उरला आहे.

श्वाइट्झर म्हणतो : " व्यक्तित्वाकडे दुर्लक्ष कराल तर स्वतंत्रतेचें व विचाराचें मोल नाहींसें कराल आणि संघटनेचा पराभव होईल, वैयक्तिक निर्णय आणि नीतिमत्ता सामुदायिक निर्णयांत आणि नीतिमत्तेंत बुडून जाईल. सुसंस्कृत दिसणाऱ्या परंतु आंतून रानटी असलेल्या आधुनिक राज्यांतील बहुसंख्य नागरिक ' आपण स्वतः नीतिसंपन्न व्यक्ति आहोंत कीं नाहीं', या गोष्टीचा विचारच करावयास तयार नाहींत. त्यांना असें भय वाटत असतें कीं, असें केल्यानें भोंवतालच्या माणसांशीं सारखा विरोध होत राहील. बुद्धिवाद आणि तत्त्वज्ञान यांचा जेव्हां जमाना होता तेव्हां, बुद्धि आणि नीति यांच्यावर समाजाचा विश्वास होता; त्यामुळें समाज व्यक्तीला मदत व मान्यता देत असे. सामान्य जनता आणि विशिष्ट व्यक्ति यांच्यामध्यें मेळ होता. या बाबतींत सध्यां कुचंबणा होत आहे. सामान्य जनतेला आपण शरण जात आहोंत; आपला मतभेद दाबून टाकीत आहोंत. जनतेला पूर्णतेकडे नेणारी शक्ति, या नात्यानें आपण वागत नाहीं. "

श्वाइट्झरला वाटतें कीं, आपली सत्यावरची श्रद्धा उडाली आहे आणि मजबूत मूल्यें शिल्लक नाहींत म्हणून हा गोंधळ उडत आहे. ही परिस्थिति अधिक बिघडत आहे, याचें कारण संबंधांचा व्यत्यास किंवा उलटापालट होय, भौतिक आणि आध्यात्मिक यांच्या संबंधांचा व्यत्यास होय, असें तो म्हणतो. परिस्थिति निर्माण केली म्हणजे त्यांतून आध्यात्मिक संबंध निर्माण होतो, असें आपल्या काळांत समजलें जातें. वस्तुतः मूल्यवान् आध्यात्मिक तत्त्वच वस्तुस्थितीवर प्रभाव गाजवतें आणि स्वतःस पूरक अशी परिस्थिति निर्माण करतें. ही श्रद्धा श्वाइट्झरच्या जीवनाची आणि लेखनाची संतत प्रेरणा बनली आहे.

विवक्षित प्रकारचा तथाकथित कार्यक्रम ज्यांत नाहीं अशा एक प्रकारच्या क्रांतीला श्वाइट्झर आवाहन देतो. " जेव्हां सर्वसामान्य जनसमुदायाच्या मनःस्थितीपेक्षां स्वतंत्र अशी मानसिक संवेदना अनेक व्यक्तींच्या ठिकाणीं निर्माण होईल तेव्हां ती संवेदना जनसमुदायावर प्रभाव गाजवूं लागेल आणि जनसमुदायाच्या मनाला अखेरीस नवा आकार देईल. " रानटीपणाचा आपणांवर जो हल्ला सुरू आहे, त्याच्यापासून ही नैतिक चळवळच आपला बचाव करील. नैतिकता केवळ व्यक्तींच्या ठिकाणींच उगम पावते, असें श्वाइट्झर घोषित करतो. वस्तुविषयक सामान्य तत्त्वज्ञानांतूनच ही चळवळ अखेरीस सामर्थ्य मिळवितें. अशा तत्त्वज्ञानावांचून वैयक्तिक आणि सामाजिक जीवन अस्वस्थ व आजारी बनतें. आत्म्याला ज्या शक्तीकडून मार्गदर्शन होत असतें त्या शक्तीच्याच ठिकाणीं हें रोगट अस्वास्थ्य उत्पन्न होतें.

श्वाइट्झरचें असें मत आहे कीं, विश्वविषयक सिद्धांत हें केवळ विचाराचें कार्य असतें. तें ऐतिहासिक शक्तींचें नसतें किंवा आर्थिक परिस्थितीच्या दडपणाचेंहि नसतें. अठराव्या शतकाला मानवेतिहासांत तो उच्च स्थान देतो. कारण विचारांवरील विश्वास आणि सत्याविषयीं पूज्यता हे भाव त्यांत होते. भावनेची श्रेष्ठता गाणाऱ्या भावनावादा-( Romanticism )नें बुद्धिवादाच्या अतिरेकावर टीका करून उपयुक्त कामगिरी केली आहे. परंतु बुद्धीचें रहस्य समजण्याला त्या वादाच्या योगानें अडथळा येतां कामा नये. कोरडा बुद्धिवाद आंतरिक जीवनाचीं विविध आंदोलनें थांबवितो; हा बुद्धिवाद खरा बुद्धिवादच नव्हे. बुद्धि ही आत्म्याच्या सर्व सजीव कार्यांचा स्वतःमध्यें समावेश करते; बुद्धींत विचारशक्ति आणि इच्छाशक्ति यांचा चमत्कारपूर्ण संगम होत असतो; त्याच्या योगानें आध्यात्मिक जीवन विशिष्ट तऱ्हेनें आकारास येतें.

## बुद्धिवादांतील वैगुण्यें

बुद्धिवादानें जेवढें यश संपादन केलें तेवढें इतर कोणत्याहि मानवेतिहासांतील चळवळीनें संपादन केलें नाहीं, असें सांगून श्वाइट्झर पुढें म्हणतो कीं, विश्व व माणूस यासंबंधीं बुद्धिवादाची दृष्टि अपुरी आहे. विश्व व मनुष्य या संबंधावरील विचारसरणीपेक्षां विश्व व व समाज यांच्यासंबंधाची विचारसरणी हीच विश्वविषयक विचारसरणी म्हणून बुद्धिवाद देतो. उलट आध्यात्मिक अनुभववाद योग्य तऱ्हेनें निश्चित करून सांगतो कीं, चिंतनद्वाराच विश्वदृष्टि प्राप्त होते. या चिंतनांत मनुष्य एकटाच विश्वाशीं व स्वतःशीं संलग्न राहतो. या विश्वदृष्टींत नीतितत्त्वाचा अभाव असतो. श्वाइट्झरचें








मत असें आहे कीं, विश्वाच्या ज्ञानापासून नीतिशास्त्र निष्पन्न होत नाहीं. आणखी तो असेंहि म्हणतो कीं, मनुष्यासंबंधींचें ज्ञान नीतिशास्त्राचा आधार आहे. परंतु विश्वाच्या नियमाशीं मनुष्यविषयक ज्ञान सुसंगत आहे, असें दाखवितां येणें अशक्य आहे. त्याच्या तत्त्वज्ञानाचा एक मूलभूत मुद्दा असा आहे कीं, फक्त विचार करणारी बुद्धि जीवनज्ञानाचें साधन आहे, असें म्हणतां येत नाहीं. जीवनज्ञान हें इच्छाशक्तीचें कार्य आहे. पाश्चात्त्य आणि पौर्वात्त्य दोन्हीं तत्त्वज्ञानांचा प्रश्न व उद्देश आध्यात्मिक अनुभव प्राप्त करून घेणें हा आहे. नीति आणि जीवनाचा महिमा यांची मिळणी त्यांत असते.

बुद्धिवाद ही केवळ ऐतिहासिक चळवळ किंवा घटना नाहीं. सर्व आध्यात्मिक जीवनाचा तो आविष्कार आहे. असें श्वाइट्झरचें मत आहे. परंतु पुढें जाऊन तो असेंहि म्हणतो कीं, आध्यात्मिक अनुभववाद हाहि वैचारिकतेचा आवश्यक भाग आहे. आतांपर्यंत बुद्धिवाद ( Rationalism ) आणि आध्यात्मिक अनुभववाद ( Mysticism ) हे परस्परांचे प्रतिपक्षी म्हणून राहिले आहेत; परंतु वस्तुतः तो प्रत्येक वाद स्वभावतःच अपुरा आहे. ते अन्योन्याश्रित आहेत. तत्त्वज्ञानानें नवी सफर प्रारंभिली पाहिजे, वाटेल तें झालें तरी तें सहन करण्यास तयार असलें पाहिजे, बुद्धिवाद व आध्यात्मिक अनुभववाद यांच्यांतील मौलिक सत्यांना धक्का बसणार नाहीं अशी काळजी घेणारी विश्वदृष्टि निर्माण करण्याकरितां प्रयत्न केला पाहिजे.

मूलभूत अशा तीन आवश्यकतांची परिपूर्ति करण्याकरितां विश्वदृष्टि घडविली पाहिजे : जगत् आणि जीवन यांच्या आस्तिक्यबुद्धीवर ती आधारली पाहिजे; ती नैतिक असली पाहिजे; आणि आध्यात्मिक अनुभव व बुद्धि या दोहोंचेंहि रक्षण तिच्यांत व्हावयास पाहिजे. अगदीं सोप्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे अस्तित्व हें नास्तित्वापेक्षां अधिक चांगलें असा जग व जीवन या विषयींच्या आस्तिक्यबुद्धीचा अर्थ आहे. भारतीय तत्त्वज्ञानांत ही आस्तिक्यबुद्धि कोणत्या ना कोणत्या स्वरूपांत सतत विद्यमान आहे. पण ती क्वचितच प्रभावी असते. विश्व आणि जीवन यांचें नास्तित्व मांडणारा दृष्टिकोण अव्यवहार्य असून अस्तित्वबुद्धीला पदोपदीं सवलत देण्यास तो तयार असतो. भारतीय तत्त्वज्ञानांतील या दोन्ही प्रवृत्ती आध्यात्मिक अनुभववादाला चिकटतात, असें श्वाइट्झरनें मान्य केलें आहे. या दोन विरोधी प्रवृत्तींतील शाश्वत विग्रह हें भारतीय तत्त्वज्ञानाचें असामान्य वैशिष्ट्य असून त्यामुळें त्याची वाढ झाली आहे, असें श्वाइट्झर प्रदर्शित करतो. राधाकृष्णन् यांनीं श्वाइट्झरवर जी टीका केली आहे, त्यांतून हा मुद्दा सुटला आहे, असें वाटतें.

श्वाइट्झरचें भारतीय तत्त्वज्ञानाचें समालोचन फार आकर्षक आहे. त्याचा परामर्श मी येथें घेऊं शकत नाहीं. या समालोचनांत आश्चर्य वाटावें इतका अद्ययावत् आढावा त्यानें घेतला आहे. त्यांत राजा राममोहन रायपासून गांधी व टागोर यांच्यापर्यंतचे आधुनिक भारतीय विचारवंत आले आहेत. तत्संबंधीं त्याचे निर्णय अंतर्भेदी, विवेकयुक्त आणि नावीन्यपूर्ण आहेत. इतर कोणत्याहि पाश्चात्त्य तत्त्ववेत्त्यानें इतका अलिप्तपणें भारतीय विचारांचा परामर्श घेतला नसेल. तो ही गोष्ट स्वच्छपणें सांगतो कीं, 'माझी त्यांवरील टीका म्हणजे त्यांच्या माहात्म्याचा गौरव होय, नकार नव्हे. तुलनात्मक तत्त्वज्ञानाचा अंतिम उद्देश समन्वय हा असतो; एका परंपरेचें समर्थन करून दुसऱ्या परंपरेचें खंडन करणें, हा नव्हे.'

## जीवनाचें पूजन

श्वाइट्झरनें आपल्या तत्त्वज्ञानास 'जीवनाचें पूजन' असें अभिधान दिलें आहे. विश्व आणि जीवन यांच्याविषयीं आपणांमध्यें नैसर्गिकपणें असलेली आस्तिक्यबुद्धि हा त्याचा पाया आहे. कारण जगण्याच्या स्वाभाविक वासनेशीं ती सुसंगत आहे, असें तो म्हणतो. ती नीतीला जितका जितका अवसर देते, तितका तितका शून्यवादाचा ती पराभव करते. नीतिशास्त्राची अशी मागणी असते कीं, माणसानें या जगाची आस्था बाळगून तें सुधारण्याचा प्रयत्न करावा. निवृत्तिवादी नीतिशास्त्राच्या विरोधी असलेली सक्रिय प्रेमरूपी नीति स्वानुभूतीनें जेव्हां भरलेली असते, तेव्हां प्रेमाच्या कार्याची भरभराट आपोआप होऊं लागते, ती टाळतां येत नाहीं.

श्वाइट्झरच्या कल्पनांचा काटेकोर मोजतां येणारा अभिप्राय जितका आहे, त्याच्यापेक्षां त्यांतील भावार्थ अधिक व्यापक आहे. कारण प्रत्यक्ष कृतीचें पाठबळ त्या कल्पनांना मिळालें आहे. आफ्रिकेंतल्या जंगलांत प्रगट










झालेली ही मानवमूर्ति त्या कल्पनांशीं अविभाज्यपणें संलग्न आहे. या मानवमूर्तींच्या भोवतीं कांहीं थोड्या गोऱ्या सेविका आणि डॉक्टर आणि स्वतः सेवेस वाहून घेतलेल्या काळ्या माणसांचा छोटासा गट आहे. हा माणूस रोज उषःकालीं संस्कृतिविषयक चिंतनाच्या वंदनीय तेजोवलयांत स्थिरावलेला दिसतो; त्या उष्ण प्रदेशांतील त्याची रात्र बाखूच्या सुरेख संवादी स्वरांच्या संगीतलहरींनीं भरून राहिलेली असते.

श्वाइट्झरच्या लिखाणावरून केवळ त्याच्या विचारांचीच उच्चता ठसत नाहीं तर विचार ही वस्तूच किती थोर आहे, हें ठसतें. यासंबंधची त्याला खोल जाणीव आहे. विचार हा कठीण व माहात्म्यशाली असतो, याची त्याला खोल जाणीव आहे. वास्तविक रूपानें विचार खराखुरा म्हणून जेव्हां अस्तित्वांत यतो तेव्हां त्याचा विषय काय आहे हा प्रश्न नसतो, तो स्वतःच महत्त्वाचा असतो, याची त्याला खोल जाणीव आहे. विचार माणसाला एक तर कष्टी बनवितो किंवा आनंद देतो, याची त्याला खोल जाणीव आहे. एके ठिकाणीं तो असें विलक्षण वाक्य लिहितोः ' विचार हा विचारशून्य असतो. " विचारामुळें आत्म्यावर संकटें ओढवतात, असा या विलक्षण वाक्याचा अर्थ आहे.

बाह्यतः परस्परविरोधी दिसणाऱ्या प्रवृत्ती हें श्वाइट्झरच्या विचाराचें एक अंग होय. उदाहरणार्थ, त्याचा असा दावा आहे कीं, ज्ञान हें स्वतः त्याला निराश करतें; परंतु इच्छा आणि आशा उत्साहित करतात. त्याच्या विश्वविषयक ज्ञानाचा कठिण गाभा म्हणजे सार्वत्रिक संशयवाद होय. ज्यांचा आशामय कर्मयोग, विश्वाला व मानवी इतिहासाला उद्देश आहे, प्रयोजन आहे, सार्थकता आहे, असें मानतो, त्यांच्यांत हा तत्त्वज्ञ नास्तिक ठरतो. संशयवाद्यांच्यामध्येंसुद्धां हा नीट बसत नाहीं. कारण ज्ञान, विज्ञान आणि तत्त्वज्ञान यांच्यांतून निघणारा त्याचा निराशावाद त्याच्या नैतिक व अत्यंत भावनाशील अशा आध्यात्मिक अनुभववादाशीं मेळ धरून राहतो. जीवनाचें पूजन हाच त्याचा आध्यात्मिक अनुभववाद होय. संशयवादी दृष्टिकोणापासून तो किती दूरवर भटकत जातो व फारकत करून घेतो, हें त्याच्या पुढील विधानांवरून निश्चित होतें. तो म्हणतो- " जो सूर्यकिरणांत चमकणाऱ्या बर्फाच्या स्फटिकाला धक्का लागूं नये म्हणून जपतो, झाडाचें एकहि पान हिसकीत नाहीं, किंवा एकहि फूल खुडत नाहीं, तोच मनुष्य खरोखर नीतिमान् होय. "

जीवन-पूजन या शब्दानें सूचित केलेलें सत्य इतक्या अतिरेकाला श्वाइट्झरनें नेलें आहे कीं, मनुष्याचें वैयक्तिक आणि सामाजिक अस्तित्वच, तें सत्य उल्लंघिल्याशिवाय, अशक्य ठरतें. यामुळें या गृहस्थाची कींव करावीशी वाटते. तो आत्मचरित्रांत म्हणतोः " येथील रहिवाशांनीं वाळवंटी किनाऱ्यावर पकडलेला छोटा पाणकोंबडा मी विकत घेतला; नाहींतर क्रूरपणानें तो कापला गेला असता. आतां असा प्रश्न पडला आहे कीं, त्याला जगवायचें तर मासे खाऊं घातले पाहिजेत; नाहींतर त्याला उपाशी राहूं द्यावा लागेल ! म्हणून मी त्याला मासे खावयास देऊं लागलों. माझ्या मनाला मात्र हें आवडत नाहीं. एकाला जगविण्याकरितां रोज पुष्कळसे मासे मारावयाचें ! ' . हा नैतिक आध्यात्मिक अनुभव खरा; परंतु ही केवळ थट्टा होते. निसर्ग ओळखून जीवदया जर चालत नसेल तर तिची कींव केली पाहिजे. श्वाइट्झर सारख्या नैसर्गिकतेला मान्यता देणाऱ्या तत्त्ववेत्त्याच्या बाबतींत यामुळें किंचित् आश्चर्य वाटतें.

श्वाइट्झर हा नैतिक बुद्धिवादाचा पुरस्कर्ता आहे; वरील नैतिक अनुभववाद त्यापेक्षां वेगळा केला पाहिजे. नैतिक बुद्धिवादाप्रमाणें वस्तुस्थितीपुढें वाकायचें नाहीं. वस्तुस्थितीला शरण जाण्याची कल्पना, माणसानें ध्येयाप्रमाणें वस्तुस्थिति बदलली पाहिजे, या विचारास तिलांजली देते. आज बहुतेक लोकांचा असा विश्वास आहे कीं माणसाच्या कह्यांत नसलेल्या शक्तींनेंच परिस्थिति बनत असते. म्हणून नैतिक ध्येय व कर्मयोगी बुद्धि इतिहासाचा प्रवाह बदलण्याच्या बाबतींत असमर्थ ठरते. या असामर्थ्याच्या विचारानें दुबळेपणा आणला आहे; जें घडतें तें मान्य केलें जातें. परंतु श्वाइट्झरचा असा पक्का दृष्टिकोण आहे कीं, ध्येयवाद परिस्थितीवर अंमल गाजवूं शकतो. श्वाइट्झर आणखी असेंहि म्हणतो कीं, शरणागति निर्माण करणारा विचार हेगेलनें प्रथम केला. इतिहासाची गति कसलाहि अडथळा न जुमानतां आगाऊच ठरलेल्या उद्देशाकडे वळलेली असते, सर्व कांहीं तदर्थ असतें हा तो विचार होय. या विचारानें आधुनिक जगांत बिघाड झाला आहे. त्यानेंच आधुनिक जगाचा नाश होणें संभवनीय आहे. श्वाइट्झर पुढें असें म्हणतो कीं, नीतीचें








प्राथम्य मान्य करणारी धार्मिक विचारसरणी आज कोठेंच आढळत नाहीं. नव्या प्रकारच्या विचाराची आज गरज आहे. ज्याच्यानें नैतिक ध्येयें सिद्ध होतात तोच खराखुरा विचार. त्याची अशी श्रद्धा आहे कीं, नीतिशास्त्र हें अखेरीस येशूच्या धर्माकडेच जाऊन पोहोचतें.

**त्याच्या विचारांचा मध्यबिंदु**

त्याच्या विचारांचा मध्यबिंदु अशा रीतीनें सहज सांपडतो. येशू खिस्ताच्या द्वारें ईश्वरमय होणें हीच गोष्ट शेवटीं विचारानें साधावयाची असते, अशी त्याची श्रद्धा आहे. रविवारच्या त्रिमूर्ति-पूजेपेक्षां निराळा असा दुसरा जीवनमार्गच तो कल्पूं शकत नाहीं. तत्त्वज्ञानाचे प्रश्न सोडविण्याकरितां नव्या मार्गानें जाऊन नवी विश्वदृष्टि निर्मिली पाहिजे, असें जरी तो म्हणत असला तरी खिस्ताच्या बायबलमध्येंच सर्व उत्तरांतील श्रेष्ठ उत्तर आहे, असें तो समजतो. हें बंधन स्वीकारावें कीं नाहीं, हें आपलें आपणच ठरविलें पाहिजे. श्वाइट्झरनें जें अंतिम ध्येय विचारार्थ मांडलें आहे तें आपणांस कोणत्याही स्थितींत स्वीकारलें पाहिजेच. परंतु ईश्वराशीं एकरूप होणें हें अंतिम ध्येय अमान्य केल्यास खिस्ताच्या बायबलचा आश्रय करण्याची जरूरीच राहात नाहीं, मग विचारमार्गच बदलतो.

श्वाइट्झरच्या तत्त्वज्ञानामध्यें अमान्य करण्यासारखें फार थोडें आहे. आध्यात्मिक अनुभववाद्यांमध्यें त्याच वेगळेंपण असामान्य आहे. बुद्धिवादाची त्यानें सांगितलेली महती त्याचा वेगळेपणा दाखविते. पौर्वात्य परंपरेकडे आकर्षिलेल्या पाश्चात्त्य बुद्धिवंतांमध्यें तो एकटाच असा आहे कीं, जो आध्यात्मिक अनुभवावर विशिष्ट प्रकारची टीका करून त्याची समीक्षा करतो. आधुनिक मनुष्य म्हणून मिरवणारे जे शून्यवादी आणि यंत्रवादी आहेत, त्यांना संस्कृतीचा नैतिक पाया दाखवून उत्कृष्ट उत्तर देण्याचें कार्य, त्यानें केलें आहे.

श्वाइट्झर मनुष्यजातीची प्रत्यक्ष सेवा करून नैतिक ध्येयें अमलांत आणतो, म्हणून त्याचें आकर्षण विशेष वाटतें. त्यानें सेवेमध्यें चैतन्य आणि स्थैर्य आणलें आहे. सहज थकणारा, दररोजच्या कचेरींतल्या कामांत ठराविक चक्रांत फिरणारा, यंत्रानें दाखविलेले करमणुकीचे खेळ शेळपटपणें पाहात बसणारा शहरी मनुष्य या गोष्टीकडे लक्ष देईल तर चांगलें. सीव्हर या लेखकानें त्याच्या जीवनाचें सार असें सांगितलें आहे : "जीवनाच्या चमत्काराचें रहस्य बौद्धिक जाणिवेंत नव्हे, तर गूढ अनुभूतींत, स्वार्थत्यागानें केलेल्या सेवेंतच प्रकट झालें आहे!"

वयाच्या ७७ व्या वर्षांत श्वाइट्झर आहे. परंतु आधुनिक विचाराच्या क्षेत्रांत त्याला मिळावयास पाहिजे तेवढें मोठें स्थान मिळालें नाहीं. अलीकडे दरवर्षी त्याच्या जीवनावर व कार्यावर मासिकांमध्यें पुष्कळ लेख येत आहेत व बहुत पुस्तकेंहि लिहिलीं जात आहेत. परंतु त्याचा आवश्यक तेवढा प्रभाव पडलेला दिसत नाहीं. तो अगदीं दूर एकांतवासांत राहिला आहे, हें त्याचें एक कारण असावें. परंतु अधिक महत्त्वाचें कारण असें दिसतें कीं, आज माणसांना जें प्रशंसनीय वाटतें, तें अमलांत आणण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत राहिलेलें नाहीं. श्वाइट्झर म्हणतो, "या युगाचा महिमाच असा आहे कीं, उच्चार, आचार आणि विचार यांतील विसंगतीची आवड असावी. योग्य विचारापासून दूरावल्याचें हें लक्षण आहे. सुसंगति हें योग्य विचाराचें स्वरूप होय."

अंदाधुंदी व गोंधळ एका मर्यादेबाहेर गेला म्हणजे पुरी अव्यवस्था माजून अखेरचा स्फोट होतो. आधुनिक जगास हें लागूं पडत आहे. आलबर्ट श्वाइट्झरच्या कृतीपासून आणि उक्तीपासून मार्गदर्शन मिळून तरणोपाय सांपडूं शकेल.

---

## चपला

आषाढांतिल थबथबणाऱ्या
  जलबिंदूंनीं चिंब भिजोनी
नाजुक चंचल पोर कुणी ही
  लपतछपत ये ढगांआडुनी
तनुवर ओलें वस्त्र जरीचें
  उफाळतें नव यौवन त्यांतुन
दृष्टि फिरवुनी, अवतींभवतीं
  कुणि नाहीं हें घेई पटवुन
हास्याची पण तोंच कुणाच्या
  लकेर उठली घुमवित अंबर
लाजेनें अन् चूर होउनी
  ढगांत लपली चंचल पोर !

— वि. ज. बोरकर








# अमेरिकेचा श्रेष्ठ नाटककार यूजीन ओ'नील

अमेरिकेचे श्रेष्ठ नाटककार **यूजीन ओ'नील** हे आपल्या वयाच्या ६५ व्या वर्षी नुकतेच डिसेंबरमध्यें बोस्टन येथें निधन पावले. त्यांनीं ४७ नाटकें लिहिलीं. असें म्हणतात कीं त्यांचीं नाटकें रंगभूमीवर येण्यापूर्वी, अमेरिकेंत नुसतीं 'नाटकगृहें' होतीं पण त्यांत 'नाटकें' नव्हतीं! ओ'नीलनींच अमेरिकन 'नाटकगृहां'ना खरीं 'नाटकें' दिलीं. १९३६ सालीं त्यांना साहित्याचें नोबेल पारितोषिक मिळालें. सिंक्लेअर लेविसनंतर नोबेल पारितोषिक मिळविणारे हे दुसरे अमेरिकन.

त्यांचीं बहुतेक सर्व नाटकें शोकान्तिका (Tragedies) असून, आधुनिक जीवनांतील निराशेचें, वैफल्याचें, अश्रद्धेचें 'शोकान्त' चित्रण हाच त्यांच्या प्रतिभेचा प्रमुख विशेष होय. स्वतः त्यांचें जीवनहि असेंच हताश व उद्ध्वस्त झालेलें होतें. त्यांच्या मोठ्या मुलानें प्रेमभंगामुळें आत्महत्या केली. दुसरा एक मुलगा अफूबाज निघाला. त्यांच्या इच्छेविरुद्ध त्यांची मुलगी चार्ली चॅप्लिनशीं लग्न करून चॅप्लिनची चौथी बायको झाली. स्वतःची त्यांची तिसरी बायको, तिच्याशीं त्यांचें इतकें पटेनासें झालें कीं तिला दोन वर्षांपूर्वी ते वेड्याच्या इस्पितळांतच लोटणार होते! त्यांच्या निःस्नेह, एकाकी, रुग्णाईत जीवनाचा अंतहि शेवटीं एका हॉटेलांत त्यांच्या नाटकांतील दुःखदायक प्रवेशाप्रमाणेंच दुःखकारक वातावरणांत घडून आला!

ओ'नील यांचा दुसरा विवाह १९१८ सालीं झाला. विवाहविधीच्या वेळीं घेतल्या जाणाऱ्या प्रतिज्ञेंत नेहमीं 'Until death do us part' ('मृत्यूनें आमची ताटातूट होईपर्यंत') असे शब्द असतात. ओ'नील यांनीं त्यांतील एक शब्द बदलून 'Until love do us part' ('प्रेमामुळें आमची ताटातूट होईपर्यंत') अशी प्रतिज्ञा घेतली.—आणि त्यानंतर ११ वर्षांनीं त्यांनीं दुसऱ्या पत्नीशीं घटस्फोट घेऊन एका नटीशीं तिसरा विवाह केला.

"माझा अंतरात्मा सबमरिनसारखा आहे" असें ओ'नील यांनीं म्हटलें आहे. या 'सबमरिन'च्या खोल चिंताव्याकुल गाभ्यांतून त्यांनीं आपल्या नाटकांचे टॉर्पेडो फेंकले. त्यांपैकीं अर्धे टॉर्पेडो फुसके निघाले. परंतु बाकीच्या 'टॉर्पेडो'मुळें मात्र टोकियो ते कोपनहेगनपर्यंत पसरलेला नाटकप्रेमी रसिकवर्ग खडबडून जागा झाला!

आपल्या नाट्यवाङ्मयांतून ओ'नील यांनीं निर्माण केलेलें 'ब्राऊन' हें पात्र आधुनिक मनुष्याच्या मनोव्यथेचें प्रतीक आहे असें म्हणतात. आधुनिक मनुष्याच्या मनोव्यथेची, त्याच्या मानसिक रोगाचीं लक्षणें कोणतीं? स्नेहभावनेच्या ऐवजीं स्वामित्वभावनेनें पछाडलेलें; आधुनिक यांत्रिक युगानें व्यक्तित्व चिरडून टाकलेलें; श्रद्धा बधिर होऊन गेलेली; 'परंपरागत ईश्वर मेलेला'!—हींच लक्षणें ओ'नील यांना अमेरिकन जीवनांत दिसलीं. त्यामुळें साहजिकच त्यांच्या प्रतिभेनें शोकान्तिकांना जन्म दिला. त्यांच्या एका ('Web') नाटकांत तीन मुख्य पात्रें म्हणजे एक वेश्या, एक कुंटणखान्यांतला मनुष्य, आणि एक खुनी—अशीं असून त्या नाटकाचा आरंभच 'Gaud! what a night!' या ओळीनें होतो. लक्षणेनें म्हणायचें झालें तर त्यांच्या नाटकांतून याच ओळीचा निशाचरी सूर वाहत आहे. असें म्हणतात कीं ओ'नीलच्या नाटकांत, ज्यांना वेड लागलें अशीं सात, ज्यांनीं आत्महत्या केली अशीं आठ, ज्यांचे खून झाले अशीं बारा आणि इतर मेलेलीं २३—पात्रें आहेत. चुरडलेलीं सुखस्वप्नें, पिरगळून टाकलेल्या प्रेमभावना, मरगळून गेलेल्या आशा—या सर्वांचें चित्रण त्यांच्या नाटकांतून होतें. त्यांचीं नाटकें म्हणजे भग्न हृदयाचे एक्स-रेनें काढलेले फोटोच होत! बर्नार्ड शॉनें ओ'नील यांना 'Banshee Shakespeare' ('अशुभ ऐकविणारा शेक्स्पिअर') असें संबोधिलें होतें.

ॲरिस्टॉटलच्या मताप्रमाणें शोकान्त नाटकांतील नायक हा श्रेष्ठ वर्गांतला आणि धीरोदात्त पाहिजे. या उलट ओ'नीलच्या शोकांतिकेंतील नायक व पात्रें समाजांतील अगदीं कनिष्ठ थरांतली असून, एका टीकाकारानें म्हटल्याप्रमाणें तीं आरंभीं दारूबाज म्हणून येतात त्याणि

'Time' या साप्ताहिकांतील लेखाच्या आधारें प्रस्तुत संकलन केलें आहे.








दारूबाज म्हणूनच अंत पावतात ! प्राचीन ग्रीक नाटककारांची शोकांतिका म्हणजे नियतीची शोकान्तिका होय; माणूस म्हणजे त्याच्या ग्रहदशेचें खेळणें होय. या उलट शेक्स्पिअरची शोकान्तिका म्हणजे मनुष्याच्या विशिष्ट स्वभावामुळें ओढवलेली शोकान्तिका होय; मनुष्य म्हणजे त्याच्या इच्छाशक्ती-( will )च्या हातांतलें बाहुलें होय. ग्रीक नाटककार आणि शेक्स्पिअर यांच्या शोकान्त नाटकांतील नायक हे शेवटीं यातना अनुभवून आपल्या मरणानें देवांना शांत करतात व मुक्त होतात. याउलट ज्या समाजाकरितां ओ'नील यांनीं नाटकें लिहिलीं, त्या समाजाच्या ईश्वर, इच्छाशक्ति ( Will ), नियति ( Destiny ) यांविषयींच्या परंपरागत श्रद्धाच पृथ्वी सपाट म्हणण्याइतक्या कोसळलेल्या ! त्यामुळें साहजिकच आधुनिक कालमहिम्याला मान तुकवून ओ'नील यांनीं आधुनिक मानवी व्यक्तीच्या मनांतील व्यथा व शोक चित्रित केला. ' माणूस म्हणजे शेवटीं आनुवंशिक बीजें ( genes ) आणि शरीरांतर्गत प्रेरणा देणारे अंतःस्राव ( hormones ) यांच्या हातांतील बाहुलें होय. ते जसा त्याला आकार देतील तसा तो होईल', असें विशेषतः आधुनिक बुद्धिवादी लोकांना मानवणारें मत ओ'नील यांनीं ग्राह्य धरून तदनुसार आपल्या नाटकांतील नायक ' परिस्थितीला बळी ' ( victims of circumstances ) गेलेले दाखविले आहेत.

अमेरिका आपला ' आत्मा ' गमावीत आहे, अशी कांहीं वर्षांपूर्वी ओ'नील यांनीं तक्रार केली होती. खरें म्हणजे ओ'नील यांनाच आपला स्वतःचाच ' आत्मा ' गवसलेला नव्हता. तथापि त्यांच्यांत व त्यांच्या नाट्यकृतींत प्रामाणिकपणा ओतप्रोत भरलेला आहे. त्यांना जें प्रतीत झालें तें डोळ्याआड करून त्यांनीं स्वतःची वंचना कधींहि करून घेतली नाहीं. विसाव्या शतकांतील अग्रगण्य नाटककार म्हणून शॉ आणि सीन ओकॅसीनंतर त्यांचाच नंबर लागतो. शोकान्तिकेच्या वृक्षराजीपलीकडे झेंप घेऊन त्यांपेक्षांहि उन्नत आणि उदात्त मानवी चारित्र्याचीं शिखरें सर करण्याचें त्यांना साधलें नाहीं. असें जरी असलें तरी त्यांच्याइतकीहि उंची चढून जाण्याचें इतरांना क्वचितच साधलें !

## रहस्य

दिशांदिशांस फांकलें अनंत जीवनांतलें
रहस्य. — त्यांत मीहि सर्व व्यक्तिमत्त्व ओतलें
व्यक्ति लोप पावली – दिशांदिशांत फांकली
रहस्यजीवनांत आंत आंत आंत रंगली !
काळकामवेग हें गणित सर्व संपलें
मध्यबिंदुमाजिं वर्तुळ क्षणांत लोपलें !
' विकास 'शब्द शब्दकोषिं लीन पूर्ण जाहला,
अधोगतीस सद्गति, तिला न जन्म राहिला !
काय जाहलें म्हणूनि ह्या जगांत सांगणें ?
काय पाहिलें म्हणूनि ह्या जगांत सांगणें ?
काय जाणलें म्हणूनि ह्या जगांत सांगणें ?
— कां उगा करूनि घेउं आपुलेंचि हांसणें !
आपुल्याचि जाणिवेचि राख अंगिं फांसुनी
आपुल्या रहस्यचिंधिनेंचि लाज राखुनी
आपुलेंचि मूक वेड पांघरूनि, चेहरा —
लोपवूनि चालणें ! – असाचि मार्ग हा बरा !

— जनार्दन देशपांडे








